—मनोहर ग्रंथमाला : प्रकाशन ६४ वें—

# आंबट-गोड

अच्युत बर्वे



८ जून १९५१

मूल्य २ रुपये



प्रकाशक : मनोहर महादेव केळकर
मनोहर ग्रंथमाला, १०६/८५ सदाशिव, पुणें २.

मुद्रक : चिंतामण पांडुरंग मोडक
भारत मुद्रणालय, ३४४/४५ नारायण, पुणें २.



मुखपृष्ठावरील चित्र : रघुवीर मुळगांवकर

---





माझे मार्गदर्शक,

स्नेही

व हितचिंतक

**श्री. चं. वि. बावडेकर**

यांस—

# कथा क्रम





# १ : "भाऊजी शपथ आहे"

" एवढी ओरडतें मी, पण इकडे लक्ष देणं होईल असं कांहीं वाटत नाहीं. रोज रोज मेलं तेंच तरी काय सांगायचं ! अहो, ऐकलंत कां !" उमा वहिनी तणतणत देवघराच्या दाराशीं येऊन थबकल्या. देवघरांत दादांची पूजा रंगांत आली होती. लंगड्या बाळकृष्णावर तुळशीच्या मंजिऱ्या रचतां रचतां दादांचं कांहीतरी गुणगुणणं चाललं होतं. समईच्या सौम्य प्रकाश विठोबाच्या काळ्याकभिन्न मूर्तीवर फांकला होता—चांफ्याच्या फुलांचा मंदमधुर सुवास देवघरांतील पवित्र वातावरणांत भर टाकीत होता—दादांनीं भाविकपणं डोळे मिटले अन् विठोबाचे पाय धरले. "पांडुरंगा, पांडुरंगा, तूंच एक त्राता—शांति नांदूं दे चोहो-बाजूला—" दादा असं किती वेळ तरी विठोबाजवळ भाविकपणं बोलत राहिले असते. पण उमा वहिनींच्या, "जळ्ळी मेली शांति !—घरांत नाहीं शांति आणि जगाची उठाठेव !" ह्या शद्बांनीं ते भानावर आले. दादांनीं दरवाजाकडे पाहिलं. एका हातांत केरसुणी, दुसरा हात देव-घराच्या चौकटीवर, अंगावर ढोपरापर्यंत घेतलेलं विटकं लुगडं—उमेला अशा स्थितींत पाहून दादांना चटूकन् हंसूं आलं ! "अग पण झालं तरी काय ?" बोलतां बोलतां दादांनीं समईची वात पुढं सारली. देवघराच्या भिंती प्रकाशानं उजळून निघाल्या.

"मी म्हणतें तें हेंच !, एवढं बोललें मी पण जरासुद्धां कांहीं प्रकाश पडत नाहीं. घरांत एवढीं भांडणं होतात अन् तुम्ही साधूसारखे स्वस्थ बसतां. सदान्कदा देव ! देव !! देव !!!"

"अग हो हो—सारं कांहीं पाहतोंयू मी."

"नुसतं पाहून काय करायचं ! हातून मात्र कांहीं घडत नाहीं. तुम्हांला स्पष्ट सांगतें मी, मला तरी घरांतून बाहेर पडावं लागेल, नाहीं तर भाऊजींना तरी—बोला, कोण हवं तुम्हांला ? तुमचा भाऊ कीं मी ?"

आतां मात्र दादांना चांगलाच पेंच पडला. उमा असला कांहीं प्रश्न विचारील असं त्यांच्या स्वप्नांतसुद्धां नव्हतं. दादांची वृत्ति एक क्षणभर शावरल्यासारखी झाली. "पांडुरंगा, पांडुरंगा, तूंच एक आतां त्राता !" दादांनीं पुन्हां एकदां विठोबाचे पाय धरले.

"बाई—बाई—बाई ! तुकारामच कीं नाहीं अगदीं ! संसाराचं वाटोळं होईल तेव्हां समजेल. तें कांहीं नाहीं. मीच जातें घरांतून निघून म्हणजे तरी डोळे उघडतील. मग तुमचा देव, तुमचा लाडका भाऊ आणि लाडकी भावजय—छान चालेल संसार !"

"अग पण झालं तरी काय ?"

"व्हायचं काय ! रोजचाच प्रकार, चांगलं भाऊजींना आंघोळीला पाणी ओतलं. जरा कुठं बिसाण जास्त झालं तर ही बया पाण्यांत हात घालून पहाते. जशी काय हिलाच काळजी ! जळ्ळी मेली अवदसा !"

"पण तो तर कांहीं बोलला नाहींना !"

"बोलला नाहीं म्हणजे झालं वाटतं ! फारच शेफारली आहे. हें कांहीं आतां मला सहन होत नाहीं. बोला, कोण हवं तुम्हांला ?—मी कीं भाऊजी ?" पुन्हां नको तोच प्रश्न दादांच्यासमोर उभा राहिला. दादांनीं शेजारच्या कोनाड्यांत हात घालून गीता उघडली.

"मीच नको तुम्हांला. दुसरं कांहीं नाहीं. मीच करतें कुठंतरी काळं !" तणतणत वहिनी स्वयंपाकघरांत निघून गेल्या.

'कर्मण्येवाधिकारस्ते मा फलेषु कदाचन !" संकटाच्या काळीं आधार-स्तंभ वाटणारा आपला आवडता श्लोक म्हणत दादा ओटीवर आले.

—आणि असं त्या घरांत वारंवार होत असे. घरांत येऊन जाऊन चार माणसं! दादा, उमा वहिनी, दादाचा धाकटा भाऊ राम आणि त्याची बायको इंदिरा. रामचं लग्न झाल्यास दोनतीन वर्षं लोटलीं असतील नसतील.

दादा म्हणजे सगळ्यांचे आधारस्तंभ होते. रामच्या वयाच्या पंधराव्या वर्षींच तो मातृपितृसुखाला अंतरला. त्या वेळीं राम असेल झालं इंग्रजी चौथीपांचवींत. हेंच वय फार वाईट!—धड विचार करण्याची शक्ति नाहीं. दुसरा सांगेल तें पटत नाहीं. आणि अशा वेळीं राम आईबापांविना उघडा पडलेला; पण दादांसारखा देवमाणूस रामच्या पाठीशीं असतांना रामला वडिलांची उणीव कां भासावी!

दादा अन् वहिनींनीं रामला तळहातावरच्या फोडाप्रमाणें वाढवला. वहिनींना तर राम धाकट्या भावाप्रमाणें वाटे. काम करतां करतां वहिनींनीं रामला म्हणावं—" भाऊजी, जरा बाजारांत जाऊन भाजी आणतां कां!—" रामनं हातांतलं पुस्तक झट्दिशीं दूर करावं आणि हातांत पिशवी घ्यावी!

वहिनी खुशींत असल्या कीं रामला जवळ घेत—" कसा सोन्यासारखा मुलगा आहे. मला पण भाऊ नाहीं—राम, तूंच हो माझा भाऊ—"

दादांपेक्षांसुद्धां रामला वहिनींचा लळा लागला. रामला एखादी वस्तु हवी असली तर त्यानं वहिनींजवळ हट्ट धरावा. वहिनींनीं रामला चेष्टेंत म्हणावं, " भाऊजी! एवढें दादा दादा म्हणून नाचतां, त्यांनाच सांगाना!" ह्यावर राम खट्टू होई—' अं!—असं ग काय वहिनी!"

अन् मग वहिनी रामचा वाटेल तो हट्ट पुरवीत.

रामही एक नंबरचा हुशार. शाळेंत कधीं त्याचा खालीं नंबर गेला नाहीं. रामची हुषारी पाहून दादांचं हृदय आनंदानं भरून येई. दादांनीं रामला म्हणावं—" राम, ह्या स्कॉलरशिपच्या पैशांतून तूं एक चांगलीशी घड्याळ

शीव." ह्यावर रामनं नुसतं हो म्हणावं पण स्कॉलरशिपच्या पैशांतून वहिनींची कांहीं आवडती वस्तु आणावी. वहिनी स्वतःशींच विचार करीत, "पाठचा भाऊसुद्धां वहिणीवर इतकं प्रेम करणार नाहीं." आणि वस्तुस्थिति तशीच होती. बाहेरगांवचे कुणी पाहुणे दादांकडे आले तर त्यांना अचंबा वाटे, "राम वहिनींचा भाऊ कीं दीर?—"

सुखाचे दिवस हरिणाच्या गतीनं निघून जातात हेंच खरं!—

राम मॅट्रिक झाला आणि दादांच्याच पोस्टांत त्यानं दादांच्या पावलावर पाऊल टाकलं. घरांत एकाचीं दोन मिळवती माणसं झालीं. दादांना खूप आधार वाटूं लागला. वहिनी दिराचे वाटेल ते हट्ट पुरवूं लागल्या.

वहिनींची एकच इच्छा!—आपण रामचं एवढं सारं करतों, कुरवल्याखुपल्या आपण रामच्या उशाशीं बसून राहतों, रामनं आपलं ऐकावं. रामही वहिनींचं ऐकत होता पण—

पण—रामचं लग्न झालं आणि सुखाचे दिवस संपले. राम वहिनींबरोबर इंदिरेचंही ऐकूं लागला. मानी वहिनींना ही गोष्ट सहन होईना! "आपण रामला लहानाचा मोठा केला. रामला लागेल तें बोलण्याचा आपला अधिकार आहे. रामनं आपण सांगूं तें ऐकलं पाहिजे. बायको झाली म्हणून काय झालं! काल आलेली मुलगी ती!" वहिनी आंतल्या आंत धुसफुसूं लागल्या.

वहिनींचा लाडका राम वहिनींपासून दूर जाऊं लागला. प्रथम वहिनी आपला राग आंतल्या आंत दाबून टाकीत; पण खदखदणाऱ्या भातावर झांकणी ठाकली म्हणून तो खदखदायचा थोडाच थांबतो! कधीं कधीं वहिनींचा राग उग्र स्वरूप धारण करूं लागला. प्रथम वहिनी भांड्यांची आदळआपट करीत. मग इंदिरेला अप्रत्यक्ष रीतीनं त्या बोलूं लागल्या. इंदिरा कांहीं उलट बोलत नाहीं असं पाहिल्यावर वहिनी उघड उघड बोलूं लागल्या.

परवांचाच प्रसंग ! डोकं दुखत असल्यामुळं राम पोस्टांतून लवकर घरीं आला. इंदिरा सांबरशिंग उगाळूं लागली. वहिनींनी हें पाहिलं मात्र !—"का ग इंदू, कुणाचं डोकं दुखतंय् ?"

" फार नाहीं—थोडं डोकं दुखतंय म्हणून हे घरीं आले.—"

"मला न सांगायला मी मेलें होतें वाटतं !" वाटेल तें वहिनी बोलूं लागल्या. वहिनी रामच्या कपाळाला सांबरशिंगाचा लेप देऊं लागल्या. तेव्हां इंदिरेनें सहज म्हटलं, "बाई, डोळ्यांत जाईल हं." त्यावर वहिनींनीं रुद्रावतार धारण केला; "कालची पोर तूं ! आणि लागलीस मला अक्कल शिकवायला ? एवढा लहानाचा मोठा केला तेव्हां तूं आली होतीस वाटतं !—लहानपणापासून एवढ्या खस्ता खाल्ल्या, एवढीं जाग्रणं केलीं-सगळं चुलींत गेलं. घे—सांभाळ तुझा नवरा आणि तूं !" असं म्हणत वहिनी स्वयंपाकघरांत निघून गेल्या. इंदिरेनं रामकडे पाहिलं—इंदिरा चमकली. रामचे डोळे तरारले होते.

इंदिरेनं खूप विचार केला—"आपलं कुठं चुकतं का ?"—रामच्या कपाळावरून हात फिरवतां फिरवतां तिनं हलकेच विचारलं—"रागा-वलांत होय ?—चुकलं कां कांहीं माझं ?—"

"नाहीं ग, वेडी कुठची" रामनं इंदिरेला पटकन् जवळ ओढली. इंदिरेचं समाधान झाले. 'त्यांना तरी माझं वागणं चूक वाटत नाहीं.' हीच गोष्ट तिला सुखद वाटत होती. त्यांच्या जोरावर वाटेल त्या संकटांशीं झुंज द्यायची तिची तयारी होती.

"पण मग मधांशीं तुम्ही कां नाहीं बोललांत ?—उलट मलाच दटावलंत !"

"कसं सांगूं तुला !—तुम्ही सगळीं चांगलीं अहा ग—पण तुमचे स्वभावच असे आहेत." बोलतां बोलतां रामचा गळा दाटून आला. इंदिरेनं ताडलं कीं, आतां जास्त विचारण्यांत अर्थ नाहीं. आढ्याकडे

पाहतां पाहतां रामच्या मनांत विचार येत होते, "दादांचा स्वभाव अति शांत! कधीं दुसऱ्याला बोलणार नाहींत. वहिनी मायाळू पण फटकळ!—काय लागेल तें काम करतील, पण तोंडाच्या फटकाऱ्यानं एक घाव कीं दोन तुकडे, इंदिरा तर घरांत नवीन आलेली. तिचंही बरोबर आहे. पण—"

"झाल्या वाटतं गुलगुल गोष्टी बोलून!" वहिनींच्या शब्दांनीं रामची विचारमालिका खळ्‌कन् तुटली. "चांगला चालवशील त्याचा संसार; अगदीं बायल्या केलास त्याला!" आणि ह्यावर दुसऱ्याला चीड आणणारं वहिनींचं विकट हास्य खोलीभर पसरलं.

इंदिरा मुळूमुळू रडूं लागली. तिला वाटे, "जाऊबाई ह्यांचं एवढं सारं करतात! अगदीं मनापासून करतात—पण मीही त्यांची बायकोच नव्हे का! त्यांची काळजी मी घ्यायची नाहीं तर कुणी! त्यांना दुखल्या खुपल्या मी जपायचं नाहीं तर कुणी?—ह्याच्यांत बाईंनीं चिडण्यासारखं काय आहे कुणास ठाऊक!—"

वहिनींची विचारसरणी मात्र जरा निराळी होती—"रामला मी वाढवला--खेळवला--रामवर इंदिरेपेक्षां माझाच जास्त अधिकार पोंचतो. इंदिरा काय! कालची पोर।"

शांत स्वभावाचे दादा ह्या साऱ्या गोष्टी न बोलतां ऐकत होते—पाहत होते--दादा विचार करीत, "हिचाही स्वभाव चांगला आहे, इंदिराही चांगली आहे--पण स्वभाववैचित्र्य! -मरमरेतों ही काम करते, पण तोंडाच्या फळकळपणामुळं साऱ्यावर पाणी पडतं. भावना दूर राहतात अन् क्षुल्लक गोष्टींचा विपर्यास होतो—" विचार करतां करतां दादा स्वतःशींच हंसले. पांडुरंगाकडे पाहून दादा असेंच हंसत. "ते कांहीं नाहीं—लावलाच पाहिजे ह्या गोष्टीचा सोक्षमोक्ष!—' विचार करतां करतां दादांनीं देवघरांत पाऊल टाकलं. दादा पाटावर

बसतात न बसतात तोंच वहिनी तणतणत देवघराच्या दारशीं आल्या. "बाई-बाई-कळस झाला! आतां मात्र मी ऐकणार नाहीं. एक भाऊजींना तरी बाहेर पडावं लागेल नाहींतर मला तरी-बोला, कोण हवं तुम्हांला! मी कीं भाऊजी?--" दादांनीं शांतपणं उमेकडे पाहिलं. उमा रागानं थरथर कांपत होती. दादांनीं परत एकदां विठ्ठल--रखुमाईकडे पाहिलं. रखुमाईच्या चेहऱ्यावर सौम्य मधुर हास्य विलसत होतं!

एकदोन क्षण स्तब्धतेंत गेले.

"बोला म्हणतें ना!—कोण हवं तुम्हांला—मी कीं भाऊजी!" पुन्हां एकदां वहिनी कडाडल्या. दादांनीं पुन्हां एकदां पांडुरंगाकडे पाहिलं. देवाची पूजा किंचित् ढासळल्याचा दादांना भास झाला— "फार झाला तमाशा. तूंच सांग त्याला आतां—" बोलतां बोलतां दादांचा कंठ दाटून आला.

"काय?"

"कीं आतां दुसरं बिऱ्हाड पहा—" आणि ह्यावर एकही शब्द न बोलतां दादा देवघराच्या बाहेर आले.

वहिनी तणतणतच बाहेर आल्या. "बरं झालं ह्यांनींच सांगितलं दुसरं घर पहायला म्हणून नाहींतर नवराबायकोनं माझ्यावर आळ घातला असता. इतके दिवस सांगत होतें पण कांहीं झालं नाहीं नीट वागायला. बरं झालं आतां भावानंच कान टोंचले ते."

वहिनींचे शब्द रामच्या कानांत तापल्या तेलाप्रमाणं उतरत होते. इंदिरेनं रामकडे पाहिलं. रामचा चेहरा गोरामोरा झाला. इंदिरेनं चटकन् तोंड फिरवलं. वहिनींच्या तोंडाचा पट्टा चालूच होता. "आतां कळेल सुख, लोक लाथा मारतील तेव्हां समजेल. इतके दिवस आयत्या पिठावर ओढीत होते रेघोट्या-आतां जप किती तें जपायचं! कुणीसुद्धां फिरकणार नाहीं." शेवटचीं वाक्यें इंदिरेला उद्देशून

होतीं. इंदिरेनं तीं ऐकलीं! तिला एकदम हुंदका आला. "बाई--बाई! कोण कांगावखोरपणा ? मी बोलतें तें दिसतं पण ह्यांची कृति माल !-"

रामनं साऱ्या गोष्टींचा सारासार विचार केला, "छे, लावलाच पाहिजे ह्याचा सोक्षमोक्ष-" राम तडक दादांकडे आला. "दादा-"

"काय राम !-"

"दादा, तुम्हीं सांगितलं ?"

"होय राम, फार झाला तमाशा. घरांत राहून एकमेकांचीं मनं दूषित असण्यापेक्षां—भांड्याजवळ भांडं ठेवलं कीं तें वाजायचंच-त्यापेक्षां तीं दूर ठेवलेलीं काय वाईट !—" दादा वरवर रामजवळ बोलत होते. पण दादांच्या हृदयांत काय खळबळ चालली होती कुणास ठाऊक !-कदाचित्, "रचलेला डाव उलटला नाहीं म्हणजे मिळवली. पण कांहीं झालं तरी शेवटीं—" असेच कांहींतरी विचार दादांच्या मनांत येत असावेत. दादा स्वतःशींच मनमोकळेपणं हंसले.

—घरांत फुटाणे फुटतच होते.

रामनं प्राप्त परिस्थितीला तोंड देऊन दुसरीकडे जागा पाहिली. रामला जायला दोनतीन दिवस उरले होते. घरांत स्मशानशांतता पसरली होती. ह्या शांततेचा जो कांहीं भंग होई तो वहिनींच्या थूत्कारण्यानंच !—

रामनं स्वःतचं म्हणून घरांत आणलेलं सामान वहिनींनीं एका बाजूला काढलं. इंदिरेच्या माहेरून आलेली एकूण एक वस्तु वहिनींनीं कोपऱ्यांत जमा केली.

वहिनींच्या हातून क्रांति घडत होती—पण कां कुणास ठाऊक ! त्या मुखस्तंभ मात्र बनल्या. वहिनी फारसं बोलत नसत. एखादा शब्द बोलल्या म्हणजे फार.

रामनं सामानाच्या ढिगाऱ्याकडे पाहिलं. सामानाची 'बॅग'—कपड्यांचा सेट—'ट्रे'—अंगावर घ्यायची तांबडी शाल—रामनं चटकन्

तोंड फिरवलं. ह्या साऱ्या वस्तु वहिनींच्या आवडत्या म्हणून रामनं मुद्दामच त्यांच्यासाठीं आणल्या होत्या.

सामानाची गाडी दारांशीं येऊन उभी राहिली.

रामनं वहिनींच्या आवडत्या वस्तु एका बाजूला काढल्या. बाकीच्या वस्तु गाडींत भरल्या गेल्या.

वहिनींनीं सामान ठेवल्याजागीं पाहिलं—कपबशांचा सेट, ट्रे, तांबडी शाल नेमक्या वहिनींच्या आवडत्या वस्तु जागेवर शिल्लक राहिल्या होत्या.

वहिनी चपापल्या—गोंधळल्या !

वहिनींनीं इंदिरेच्या सामानाकडे पाहिलं—वेणीफणीची पेटी, कुंकवाचा करंडा—वहिनींना गहिवरून आलं. इंदिरेनंही वहिनींच्या आवडत्या वस्तु वगळल्या होत्या.

दादा ह्या साऱ्या हालचालींकडे लक्षपूर्वक पाहत होते. स्वतःशींच हंसत दादा माजघरांतून ओटीवर आले.

तोंडाला खीळ न घालणाऱ्या वहिनी मुखस्तंभाप्रमाणं बनल्या.

रामची जायची वेळ येऊन ठेपली. दाराशीं गाडी उभी राहिली. दादा धांवत धांवतच पुढं झाले. " जा राम, आंत जा आणि देवाला नमस्कार कर—" दादांच्या सूचनेंत मिस्कीलपणा कांठोकांठ भरला होता.

वहिनींना नमस्कार करण्याकरतां राम खालीं वांकला— " वहिनी, जातों मी— आजपर्यंत संभाळ केलास तूं माझा. आतां तुझं छत्र नाहीं. वहिनी, आशिर्वाद दे आतां. तुझ्या आशिर्वादाच्या जोरावर—" वहिनींना एकदम हुंदका आला. त्यांनीं दरवाजाकडे पाहिलं. हातांत कुंकवाचा करंडा घेऊन इंदिरा देवघराजवळ उभी होती. " नाहीं—भाऊजी मी बोलतें म्हणून—तसं मला वाटतं असं मात्र तुम्ही समजूं नका. नाहीं भाऊजी—शपथ आहे माझी तुम्हांला —मी बोलतें म्हणून रागावूं नका हो—भाऊजी—शपथ आहे म्हणते ना—मी जिवंत असेपर्यंत ह्या घराचा

उंबरठा ओलांडायचा नाहीं—” दादांनीं आंत डोकावून पाहिलं. उमेच्या अश्रूंत दादांना गंगेच्या पाण्याचा भास झाला—“ तरी मला वाटलंच होतं—शेवटीं भावना आडव्या यायच्याच—” स्वतःशीं व ःहंसत दादा देवघराकडे वळले. आंत वहिनी रामला सांगत होत्या—“ नाहीं—भाऊजी —जाऊं देणार नाहीं मी तुम्हांला—शपथ आहे माझी—” आणि बाहेर दादांच्या तोंडचा “ कर्मण्येवाधिकारस्ते......” हा श्लोक ऐकूं येत होता.

---

## २ : कूपन

गोष्ट दोन भावांची आहे. दोघांपैकीं एक माझा शेजारी आहे. भलोबा त्याचें नांव. मी आपला त्यांना भाऊसाहेब असें म्हणतों. माझ्या व त्यांच्या घरांतील मुलेंबाळेंही त्यांना ह्याच नांवानें हाक मारतात. मोठा मनमोकळा आणि दिलखुलास माणूस. नाहीं म्हटलें तरी गेलीं चारपांच वर्षें आम्हीं एकमेकाला धरून आहों. तसा आमचा घरोबाही चांगला आहे. आतां इतक्या वर्षांच्या सहवासानंतर वाटते, कीं असा शेजारी मिळणें हें मोटें भाग्याचें आहे.

आम्ही आपलें असें ठरवून ठेवलें आहे, कीं दिवसाकांठीं थोडा वेळ तरी एकत्र येऊन गप्पा मारावयाच्या आणि मग आपापल्या कामधंद्याला निघून जावयाचे. रविवार किंवा सुटीचा दिवस असला तर रोजच्यापेक्षां थोडा जास्त वेळ बसावयाचें.

नेहमीं मी भाऊसाहेबांना हांक मारावी आणि त्यांनीं, 'कसें काय जनुभाऊ' म्हणून हंसत हंसत बाहेर यावे हें आपलें ठरलेलें. एखाद वेळ ते बाहेर आले नाहींत तर मी ओळखावे, कीं आज कांहीं तरी बिनसलें आहे. मग मीं पुढें व्हावें आणि जास्त आपुलकीनें चवकशी करावी.

आजही असेंच झालें.

नेहमींप्रमाणें मीं दोनतीन हांका मारल्या. पण भाऊसाहेब कांहीं बाहेर येण्याचें चिन्ह दिसेना. तेव्हां पुढें होऊन दरवापाजाशीं उभा राहिलों.

आंतल्या खोलींत, जुन्या पत्रांचा पसारा घालून तो चाळण्यांत भाऊसाहेब दंग झालेले. तारेला अडकवलेल्या जुन्या पत्रांतील एखादें पत्र काढून घ्यावें, त्यावरून अस्वस्थपणें नजर फिरवावी आणि मग इतर पत्रांत

तें फेकून द्यावें. कांहींतरी त्रासदायक विचार सुरूं व्हावा. विचार बाजूला सारून पुन्हां पत्रें चाळूं लागावें. पुन्हां थांबावें. शर्टच्या खिशांतून मनि-ऑर्डरच्या कूपनासारखें कांहींतरी बाहेर काढावें आणि न वाचतांच नुसत्या भरलेल्या डोळ्यांनीं त्याकडे पाहात रहावें.

वाटलें, कीं भाऊसाहेबांसारखा माणूस ज्याअर्थीं इतका अस्वस्थ झाला आहे, त्याअर्थीं तसेंच कांहींतरी कारण घडलें असावें. दुःखाच्या आहारीं न जातां मोठ्या संयमानें आणि धीरानें वागावयाचें किंवा दुःख फारच जाणवूं लागलें तर मला हांक मारून दुःख हलकें करावयाचें ही त्यांची नेहमींची पद्धत.

आमचा नेहमींचा रिवाज आठवून भाऊसाहेबांना हांक मारून मीं म्हटलें, "छान ! मघांपासून मी हांक मारतों आहे आणि तुम्हीं इकडे..."

"अरेच्या ! केव्हां आलां कांहीं कळलेंसुद्धां नाहीं. आणि अगदीं परक्यासारखं बाहेर उभे राहून—"

"छे छेः ! हा आतांच आलों. आज सुटीचा दिवस म्हणून जरा लवकरच हांक मारली. तुम्हीं कांहीं काम काढलें असेल तर—"

"नाहीं हो ! बसा इथेंच. मीच हांक मारणार होतों तुम्हांला." भाऊसाहेबांनीं हांसल्यासारखें करून माझ्याकडे पाहिलें.

दुःखाच्या वेळीं आपलें दुःख दुसऱ्याला उमगूं नये म्हणून माणूस हांसण्यासारखे सोंग करतो. पण तें इतकें केविलवाणें असतें कीं वाटतें, अशा वेळीं माणूस हांसला नाहीं तर किती बरें होईल !

स्वतःशींच कांहींतरी पुटपुटत भाऊसाहेब समोरचीं पत्रें आवरूं लागले. त्यांना पत्रें आवरतांना पाहून मी म्हटलें, " आज कांहीं विशेष काम काढलेलें दिसतें. हीं जुनीं पत्रें. . ."

"छे हो ! विशेष कसले ! जुनीं पत्रें निकालांत काढण्यासाठीं चाळीत होतों. चाळतां चाळतां..." एकदम थांबून ते दुसरीकडे पाहूं लागले.

आपलें दुःख दुसऱ्याजवळ उघडें करतांना माणूस क्षणभर थांबून उगाचच विचार केल्यासारखे करतो आणि मग आपलें दुःख सांगूं लागतो हें मला आतां अनुभवानें ठाऊक झालें होतें.

कांहीं काळ आम्हीं दोघेही स्तब्ध होतों. एकमेकांना टाळून उगाचच इकडे तिकडे पाहात होतों. कांहींतरी बोलून ह्या विचित्र शांततेचा भंग करणें आतां माझें काम होतें. काय बोलावें ह्याचा विचार चालू असतांच भाऊसाहेब म्हणाले, "हीं जुनीं पत्रें चाळतां चाळतां हे मनिऑर्डरचे कूपन हातीं लागलें. जुने प्रसंग दृष्टीसमोर उभे राहिले. काळानें नष्ट केलेल्या गोष्टींच्या वेदना पुन्हां ठणकूं लागल्या." बोलतां बोलतां त्यांचे डोळे भरून आले. क्षणभर स्तब्ध राहून ते पुन्हा बोलूं लागले. "हें दुःख मी तुम्हांला केव्हांतरी सांगणारच होतों. सलणारी गोष्ट तुमच्याजवळ सांगितली कीं तेवढेंच बरें वाटतें. संसारांत आपण पावलोपावलीं कटुता सहन करतों. आणि कालांतरानें कटुतेचें शल्य विसरून जातों. वाईटा-वर चांगल्या गोष्टींचें पांघरूण घालतों आणि चांगला भाग तेवढा वारंवार आठवत राहतों. पण कधीं कधीं हें असें होतें. दडपून टाकलेल्या कटु गोष्टीची जाणाव भलत्याच वेळीं कांहींना कांहीं कारणानें होते आणि मग मात्र कटुतेचें शल्य बोंचूं लागतें. आजही असेंच झालें. सुटीचा दिवस असल्यानें सकाळीं उठल्यावर ठरविलें, कीं आज जुनीं पत्रें निकालांत काढावयाचीं. तेव्हां हीं जुनीं पत्रें घेऊन चाळीत बसलों होतों खूप जुनीं म्हणजे सुमारें दहापंधरा वर्षांपूर्वीचीं पत्रें आहेत हीं. सारीं घरगुतीं आहेत. माणसाला कसलें ना कसलें तरी वेड असतें. मला आपल्यें इतरानीं लिहिलेलीं पत्रें जपून ठेवायचें वेड आहे. ह्या वेडानेंच आतां नको त्या गोष्टींची आठवण झाली आणि नको ते प्रसंग दृष्टीसमोर उभे राहिले."

बोलतां बोलतां भाऊसाहेबानीं खिशांतून कूपन बाहेर काढलें. साऱ्या दुःखाचें मूळ त्यांच्या हातांतलें कूपन असावें हें मी आतां ओळखलें होतें. एकवार कूपन हातीं घेऊन त्यावर काय मजकूर आहे हें जाणून घेण्याची माझी उत्कंठा आतां अनावर झाली होती. भाऊसाहेबांनीं खिशांतून कूपन बाहेर काढलें, तेव्हां वाटलें कीं आतां वाचावयास मिळेल, मजकूर कळेल, कुणी लिहिलें आहे हेंही समजेल. पण त्यांनीं तें माझ्या हातीं न देतां त्यावरून पुन्हां एकदां नजर फिरवली आणि मग शेजारीं अडकित्याच्या दडपणाखालीं तें ठेवून मला म्हटलें, "प्रसंग दहाबारा वर्षांपूर्वींचा आहे. बाब घरगुती, माझ्या भावाची आहे. विसू हा माझा धाकटा भाऊ. आम्हीं दोनच भावंडें. दोघेच असलों तरी आमच्या वयांत खूप अंतर होतें. मी शिक्षण आटोपून नोकरीधंद्याला लागलों तेव्हां विसू पांच सहा वर्षांचा असेल नसेल. माझ्या पाठीवर बऱ्याच वर्षांनीं झालेलें मूल म्हणून तो सर्वांचा लाडका होता. विशेषतः आई त्याचें फार कौतुक करी. त्यांतच तो झाल्यानंतर आठ-दहा वर्षांनीं आमचे वडील अप्पा वारले. अंतकाळीं अप्पांनीं मला हांक मारून, डोळयांत पाणी आणून म्हटलें, "विसू अजून लहान आहे. आयुष्यांत तुझें सारें कांहीं मी केलें. त्याचें मात्र माझ्या हातून कांहींच झालें नाहीं. कांहीं झाले तरी त्याला अंतर देऊं नको" अप्पांना मी वचन दिलें तेव्हांच त्यांनीं प्राण सोडला. त्यांच्या मृत्यूनंतर आईनें कोंकणांत राहणें मला प्रशस्त वाटेना. वाटे कीं मी बिऱ्हाड करून मुंबईला आहें तिथेंच आईनें येऊन राहावें. तेवढेंच तिचें दुःख कमी होईल, विरंगुळा वाटेल आणि विसू नेहमीं माझ्या नजरेसमोर राहील. त्याप्रमाणें मी सुचवून पाहिलें, पण आईनें निक्षून सांगितलें, 'भाऊ तूं म्हणतोस तें ठीक आहे. पण उभी हयात इकडे गेली. आयुष्यांतलीं सुखदुःखें इथेंच भोगली. संसारांतील उन्हाळे पावसाळे इथें ह्या वास्तुखालीं काढलें. आतां

अशा स्थितींत ही वास्तु सोडून तिकडे कशी येऊं ? स्थळदेवतेच्या मनांत असेल तर अजून कशाही स्थितींत ती सांभाळ करील. तिच्यावर हवाला ठेऊन, तिच्या आसऱ्यानें मी इथेंच राहीन. तूं मात्र मधून मधून येत जा. आल्यागेल्यानें दृष्टीस पडशील. विसूला तेंवढेंच बरें वाटेल." एवढें झाल्यावर मी मुंबईला निघून आलों. विसू आणि आई कोकणांतच राहिलीं. आधींच आमच्या दोघांच्या वयांत खूप अंतर आणि नोकरीधंद्यामुळे मी हा असा नेहमीं बाहेर. त्यामुळें आमचें सूत असें केव्हांच जमलें नाहीं.

मला वाटे कीं मी त्याचा मोठा भाऊ. तेव्हां साहजिकच तो माझ्याकडे येईल जाईल. निदान मी येतों असा हट्ट तरी धरील. अडेल नडलें विचारील. कांहीं मागेल. पण माझी ही इच्छा केव्हांच पुरी झाली नाहीं. वेळोपळीं पत्रें पाठवून मी त्याला इकडे बोलावीत असे. मजेंत ये, चार दिवस रहा आणि वाटलें तर परत जा, असें लिहीत असें. पण कां कुणास ठाऊक माझ्या कुठल्याच बोलावण्याची तो किंवा आई दखल घेत नसत. वर्षाकांठीं तिकडे गेलों असतां तो भेटे एवढेंच. भेटल्यावर मात्र नीट बोले चाले. मी त्याचा वडील भाऊ म्हणून माझा मान राखी. आदबीनें काय हवें नको त्याची आस्थेनें चौकशी करी. पण ह्या आस्थेंत, ह्या आपुलकींत एक तऱ्हेच्या परकीपणाचा वास येई. विशेषतः त्याच्या भावजयी जवळ तर तो फारच परकीपणानें वागे. तिलाही त्याच्याविषयीं विशेष अशी आपुलकी केव्हांच वाटली नाहीं. वास्तविक, धाकटा दीर आणि मोठी भावजय ह्यांचें सख्य फार असतें. पण आमच्या विसूची रीत जगा वेगळी होती. तो आपल्या भावजयीजवळ असा परकीपणानें, तुसडेपणानें कां वागे हें मला त्यावेळीं उमगलें नाहीं. त्याच्या ह्या वर्तणुकीबद्दल मी एकदोनदां बायकोला विचारून पाहिलं. पण तिलाही कांहीं समाधानकारक खुलासा करतां आला नाहीं. आणि माझी बायकोही तशी लाघवी आहे असें नाही.

पुढें विसू हायस्कूलमध्यें वरच्या वर्गांत गेला. तेव्हां शिक्षणासाठीं त्यानें इकडे यावे असें मी सुचवून पाहिलें. प्रथम आईनें नकार दिला आणि विसूनें टाळाटाळी केली. पण जेव्हां मी थोडाफार लागा आणि जास्त आग्रह केला तेव्हां आई त्याला पाठवावयास तयार झाली. पण त्याला पाठवितांना आईनें स्पष्ट शब्दांत विचारलें, "भाऊ, तुला तो तिकडे यावा असें वाटतें. पण सूनबाईला विचारलें आहेस ना! तिचा सल्ला घेतला आहेस का?" एवढा मी आग्रहानें विसूला बोलावीत असतां आईनें असें कां विचारावें? विसूनें मिस्किलपणें कां हंसावें? माझी बायको तुसडी आहे, कधीं कधीं ती दुसऱ्याला लागट बोलते हें मला कबूल. पण असें असलें तरी विसूच्या देखत, आईनें मला कां तोडून टाकावें? असा मी त्यांचा कोणता गुन्हा केला होता कीं त्यांनीं मला घालूनपाडून बोलावें?

विसूला माझ्याविषयीं आपुलकी वाटावी, लळा लागावा आणि कांहीं किल्मिष असलें तर तें निघून जावें म्हणून मी त्याला इकडे आणला हें खरें. पण तें सारें आंगलट आलें. वर्ष सहा महिने आम्ही सारीं गुण्या-गोविंदानें एकत्र राहत होतों. देवदयेनें मला चार पैसे मिळत होते. अप्पांच्या पाठीमागें, माझ्या लहानग्या भावानें माझ्याजवळ सुखासमा-धानांत सहावें ह्यांत मला खरोखरच आनंद वाटे. तसें मी एकदोनदां माझ्या बायकोजवळ, जानकीजवळ बोलूनही दाखवलें. पण तिनें मला कोणत्याच तऱ्हेनें उत्तेजन दिलें नाहीं. किंबहुना, विसूच्या बाबतींत तिची वृत्ति फार थंड होती. त्याबाबत एकदोनदां मी तिला खोदून खोदून विचारलें. तेव्हां ती एवढेंच म्हणाली, "तुम्हीं सूज्ञ आहां, तुम्हांला सारें कळतें. पण मला असें वाटते कीं, हीं नातीं आणि हें सारें वाढवावें तितकें वाढतें." मला मोठें वाईट वाटलें. मनांत आलें, कीं कितीं झालें तरी विसू माझा भाऊ आहे. त्याच्याविषयीं असें वाटून कसें चालेल! जानकीच्या बोलण्यावरून मी एवढें मात्र ताडलें, कीं तिला अजूनही विसू

परका वाटतो, अजूनही आपुलकीची भावना निर्माण झालेली नाहीं. वाटे, कीं हा आपपरभाव आज उद्यां सहवासानें नाहींसा होईल. जानकीही माझ्या अंतर्यामींच्या आनंदांत मनापासून सामील होईल.

पण तसें व्हावयाचें नव्हतें. ......

एक दिवस काय झालें, मी घरांत नसतांना विसूनें कुठच्यातरी गोष्टीची मागणी केली. तिनें एकदोनदां नाहीं म्हणून सांगितलें. पण कांहीं केल्या-तो ऐकेना. तिनेंही परत परत नाहीं म्हणून सांगितलें. तेव्हां विसू जास्तच हट्टास पेटला. तो गुण्यागोविंदानें ऐकत नाहीं असें पाहून ती रागास आली. आणि रागाच्या भरांत चटकन् बोलली, "इथं काय जातंय् हट्ट करायला! मिळवत नाहीं तोंपर्यंत उगाच मिजास! इकडे पैसे मिळवतांना नाकीं नव येतात आणि ह्यांचें पाहावें तों एकेक नवीनच" झालें. त्याला एवढें पुरलें. इतका वेळ हट्ट करणारा विसू रागानें उभा राहिला. संतापानें फुलून निघाला. किती तरी वेळ तो तसाच पुटपुटत राहिला. कांहीं वेळानें मी घरीं आलों, तेव्हां त्यानें तडकाफडकीं सांगितलें, "भाऊ, मला इथें राहायचं नाहीं. आजच्या आज कोंकणांत आईकडे जाणार आहे." नाना तऱ्हांनीं मी त्याला सांगून पाहिलें, दटावून पाहिलें. पण त्याचें म्हणणें आपलें कायम!

केवढ्या उत्साहानें मी त्याला इकडे आणला होता! केवढ्या आशा-इच्छा मनाशीं बाळगल्या होत्या! पण काय उपयोग! एखाद्या निर्दया-सारखा माझ्या हृदयावर घाव घालून तो निघून गेला. बरें मी म्हणतों, एक वेळ तो निघून गेला पण त्याबाबतींत आईनें तरी कांहीं बोलावयाचें होतें? समजुतीनें किंवा दटावून चार गोष्टी त्याला सांगावयाच्या होत्या! पण नाहीं. आईही माझ्यावर उलटली. तिनेंही विसूचीच बाजू घेतली.

त्या दिवसापासून आम्ही एकमेकाला दुरावूं लागलों. आणि दिवसें-दिवस गोष्टी अशा तऱ्हेनें घडत गेल्या, कीं आमच्या दोघांमधलें अंतर

वाढूं लागलें. तेव्हां मी असें ठरविलें, कीं वर्ष दोन वर्षें गप्प बसावयाचें, त्याच्या वाटेसच जावयाचें नाहीं. अजून पोरवय आहे, स्वभाव हूड आहे. आज–उद्यां सर्व गोष्टी समजूं लागतील आणि आपोआपच आपुलकी निर्माण होईल.

अशा स्थितींत एकदोन वर्षें निघून गेलीं.

एवढ्या अवधींत विसू मॅट्रिक झाला. तो मॅट्रिक पास झाला, तेव्हां मुद्दामच मी कोंकणांत गेलों. मला फार वाटे, कीं त्यानें कॉलेजांत जावें. खूप शिकावें, मोठा व्हावें आणि जगासमोर यावें. आयुष्यांत शिक्षणाच्या बाबतींत जी शर्यत मी हरलों, तीच शर्यत माझ्या भावानें–विसूनें जिंकावी. त्याप्रमाणें मी त्याला बोलूनही दाखविलें. प्रथम तो गप्प बसला आणि नंतर म्हणाला, "मलाही वाटतें, कीं खूप शिकावें, जगासमोर यावें, शिकून मोठें व्हावें, चांगलें विलायतलासुद्धां जाऊन यावें, पण कॉलेजचा खर्च झेपण्याइतकी आपली सांपत्तिक स्थिति खास चांगली नाहीं. आतां आईही थकत आहे. अप्पांच्या पाठीमागें आईनें मला एवढें शिकविलें, तेंच पुष्कळ झालें." त्याचें हें बोलणें ऐकून मला वाईट वाटलें ! त्याचा मी एवढा मोठा भाऊ त्याच्या पाठीशीं असतांना त्यानें असें कां बोलावें ? असें कां वागावें ? कॉलेजचें शिक्षण घेण्याइतपत सांपत्तिक स्थिति चांगली नाहीं हें मलाही कळत होतें. दिवसानुदिवस आई थकत होती, हेंही मला दिसत होतें. असें असूनसुद्धां ज्याअर्थीं मी त्याच्याजवळ बोलणें काढलें, त्याअर्थीं पैसे खर्च करावयाची माझी तयारी आहे, ऐपत आहे, हें त्याला कळावयास हवें होतें. पण तें त्याला कळलें नाहीं. कळलें नाहीं, कीं कळून सवरून माझ्यापासून त्यानें तें मानभावीपणानें लपवून ठेवलें ! त्याचा तोच जाणे —

वास्तविक एवढें झाल्यावर तो विषय मी तेवढ्यावरच सोडून द्यावयास हवा होता. पण मला राहवलें नाहीं. त्याला मी पुन्हां म्हटलें, "तूं असें कसें

म्हणतोस ? मी का कुणी परका आहे ? सध्यां चार पैसे हाताशीं आहेत, शिकून घे–" ह्यावर तो फक्त हंसला. मी हंसण्याचें कारण विचारलें. तेव्हां त्यानें प्रथम टाळाटाळी केली. पण मग उलट मलाच सवाल टाकला, "मी शिकावें अशी तुझी खूप इच्छा आहे. पैसे खर्चावियासही तूं तयार आहेस. पण तुलाही मुलेंबाळें आहेत आणि हें सारें वहिनींला विचारलें आहेस का ?" मी चमकलों. वाटलें, कीं विसूच का हें मला विचारीत आहे ? पण त्याच वेळीं मी मनाशीं खूणगांठ बांधली. ध्यानांत आलें, कीं गत गोष्टी विसू अजून विसरलेला नाहीं. तुम्हीच सांगा जनुभाऊ, रागाच्या भरांत माणूस कांहीं तरी बोलून जातो, पण म्हणून कां तें नेहमीं मनांत ठेवायचें ? त्या वेळीं रागाच्या भरांत जानकीनें विसूला तोडून टाकलें, तिनें तसें वागावयास नको होतें, सारें कांहीं मला पटतें. पण म्हणून का मी त्याच्या मोठ्या भावानें त्याचे पाय धरून, " विसू, तिचें चुकलें. मला क्षमा कर " असें नाटकी बोलावयास हवे होते !

बोलण्याच्या भरांत आलेले भाऊसाहेब एकदम थांबले. किंचित् माझ्या बाजूला सरकून हलक्या आवाजांत पुन्हां सांगूं लागले, "आणि जनुभाऊ, जानकीच्या बाबतींतही माझी स्थिति मोठी चमत्कारिक झाली आहे. होतां होईं तों नवऱ्यानें स्वतःच्या बायकोविषयीं त्रयस्थाजवळ बोलूं नये; पण तुम्ही कांहीं परकी नाहीं आणि आतां ओघांतच आलें म्हणून सांगून टाकतों; तुम्ही माझ्या बायकोला, जानकीला ओळखतां, ती किती गुणी आहे, शेजाराला किती चांगली आहे, दुखल्याखुपल्यास कुणालाही किती जपते, हें सारें तुम्हांला ठाऊक आहे. पण त्याजबरोबर तिचा एक विशेष कदाचित् तुमच्या लक्षांत आला असेल. तिची वृत्ति पैशाच्या बाबतींत फार संकुचित आहे. असें कां व्हावें हें अजूनही मला उमगलें नाहीं. आपला संसार, आपलीं मुलेंबाळें आणि आपला नवरा म्हणजेच विश्व, म्हणजेच सर्वस्व, असें तिला वाटतें. आयुष्यांत आपण मिळवलेल्या पैशांत आपलें

सगेसोयरे, आपले शेजारीपाजारी ह्या ना त्या निमित्तानें वांटेकरी असतात हें तिला कांहीं अजून उमगलेलें नाहीं. ह्या तिच्या संकुचित वृत्तीचें मी केव्हांच समर्थन केलें नाहीं. उलट वेळोवेळीं मी तिला झाडलें आहे. स्पष्ट सांगावयाचें तर ह्या तिच्या स्वभावापुढें माझेंही कांहीं चालत नाहीं. हा कदाचित् माझा दोष असेल. पण असें आहे हें खरें.

ह्या तिच्या विशिष्ट स्वभावामुळें वाटतें, कीं निःसंशय तिनें विसूच्या मानी स्वभावाला बरेच वेळां दुखावलें असावें आणि विसूनेंही ते मनांत ठेवलें; मनांत ठेवलें एवढेंच नव्हे, तर वेळ येतांच तिच्यावरचा राग त्यानें माझ्यावर काढला.

त्या दिवसापासून, म्हणजे जनुभाऊ, ज्या दिवशीं विसूनें माझ्या पैशाचा त्याच्या शिक्षणासाठीं उपयोग करून घ्यावयाचें नाकारलें, त्या दिवसापासून माझें त्याच्यावरील मन उडूं लागलें. त्यानंतर दोनतीन वर्षांत मी केव्हांच घरीं गेलों नव्हतों. विसूची आणि माझी तेवढ्या अवधींत केव्हांच गांठभेट झाली नाहीं. आम्हीं एकमेकांचीं विचारपूसही केली नाहीं. त्या दोनतीन वर्षांत त्याच्यांत क्रांतिकारक बदल झाला. त्याचे विचार बदलले, त्याचे आचार, व्यवहार बदलले. त्याच्या वाचनाचीं पुस्तकें, फार काय, त्याचा पोषाख, प्रत्येक बाबतींत तो पूर्णपणें बदलला. विरक्त वृत्तीनें राहून देशाची सेवा करावयाचें खूळ त्याच्या डोक्यांत केव्हां शिरलें कांहीं कळत नाहीं. आई हयात होती, म्हणूनच तो घराला चिकटून होता. शरीरानें तो घरांत असे, पण मनानें कुठें तरी बाहेर वावरत असे.

पुढें अचानक आई वारली. त्यावेळीं आम्ही दोघे एकत्र भेटलों. मी त्याला म्हटलें, "विसू, आयुष्याच्या ज्या अवस्थेंतून तूं आतां जात आहेस ती अवस्था मोठी चमत्कारिक आहे. तूं ज्या तऱ्हेनें वागत आहेस, त्या तऱ्हेने वागण्यांत स्वाभिमान आहे असें तुला वाटत असेल. मी बोलूं नये, बोललों तर तुला राग येईल. पण कांहीं दिवसांनीं तुझें तुलाच कळेल,

की हा सारा अदूरदृष्टीचा अहंकार होता. तूं ज्या मार्गानें जात आहेस तो मार्ग धोक्याचा आहे. इतके दिवस कांहीं चुकलेमाकले सावरून घ्यायला आई होती. कसें झालें तरी तिचा आधार होता. ह्यापुढें मला तूं आणि तुला मी--" पण माझें हें बोलणें त्याला नाटकी वाटलें. नेहमींप्रमाणें तो फक्त हंसला. पण तें हास्य मोठें सूचक होतें. शेवटीं मी त्याला सांगितलें, "जेवढें मला सांगावयाचें होतें, तेवढें तुला सांगितलें. पाठचा भाऊ आहेस म्हणून राहवत नाहीं. मला ठाऊक आहे, कीं तूं मोठा मानी आहेस, पण कधीं अडचण पडली तर अनमान करूं नको. माझ्याकडे ये"

त्यानंतर आम्ही एकमेकांचा निरोप घेतला. आमचे मार्ग बदलले. व्यवहारी जगांत वावरणारा मी पुन्हां व्यवहारांत रमलों आणि बेरजा-वजाबाक्यांत गुंग झालों.

हलके हलके विसूच्या धकाधकी जीवनाला सुरुवात झाली. मधून मधून त्याचें नांव वर्तमानपत्रांत छापून येई, तेवढीच काय ती त्याच्या-विषयीं मला असलेली माहिती. कुणी कुणी त्याचें नांव घेत आणि आदरानें बोलत. अशा वेळीं मला मनापासून बरें वाटे. वर्षांतले पुष्कळसे दिवस तो तुरुंगांत असे आणि उरलेले फार थोडे दिवस तो बाहेर असे. जे कांहीं थोडे दिवस तो बाहेर असे, त्यावेळीं त्यानें माझ्या-कडे यावें, बोलावें, चालावें असें मला फार वाटे. पण नेहमीं तो धांदलींत असे. प्रचाराच्या कामासाठीं फिरत असे. मजूर, मजुरांचे कामाचे तास, त्यांचे दारिद्र्य, ब्रिटिश सरकार, गुलामगिरी, स्वातंत्र्य आणि तुरुंग हें त्याचें जीवन होतें. एवढ्या खळबळीच्या जीवनांत मला कोण विचारतो! असें मी त्याचें एवढें काय चांगलें केलें होतें, कीं घडीं घडीं माझी त्याला आठवण व्हावी? आमचे संबंध इतके कुठें घट होतें, कीं त्यानें वेळांत वेळ काढून माझ्याकडे यावें? आणि माझ्याजवळ, त्याच्या वडील भावाजवळ चार सुखदुःखाच्या गोष्टी कराव्या?

पुढें पुढें त्याच्याविषयीं कांहींच कळेनासें झालें. प्रथम प्रथम अधून मधून त्याचें नांव वर्तमानपत्रांत येई. लोकांच्या तोंडीं खेळे, पण नंतर मला त्याचें नांव कुठेंच ऐकूं येईना. त्या वर्षा दोन वर्षांच्या काळांत तो कुठें होता, काय करीत होता, मला कांहींच ठाऊक नाहीं. मनांत येई, कीं त्यानें हातीं घेतलेलें काम अर्धवट सोडून तर दिलें नसेल ! माझ्याचप्रमाणें कुठेंतरी–" भाऊसाहेबांनीं थांबल्यासारखे करून माझ्याकडे पाहिलें. अशा दृष्टीनें पाहिलें, कीं जणूं कांहीं ते मला कांहीं तरी महत्त्वाचे सांगणार होते. मी नीट सांवरून बसलों आणि लक्षपूर्वक ऐकूं लागलों. भाऊसाहेब पुढें सांगूं लागले, " पुढें एक दिवस अकल्पितपणें विसू इकडे फिरकला. चोरासारखा आला आणि दारीं उभा राहिला. वेळ तिन्हीसांजांची होती. तो आला आहे, दारीं उभा आहे, ह्यावर प्रथम माझा विश्वासच बसेना. शरीराची नुसती काटीच शिल्लक राहिली होती. गाल बसले होते. डोळे खोल गेले होते. आयुष्याची शर्यत हरलेल्या माणसाचे डोळे जसे निस्तेज दिसतात, तसेच त्याचे दिसत होते. पूर्वींचें तेज आणि आत्मविश्वास जाऊन त्या ठिकाणीं आतां भीरुता वावरत होती.

काय बोलावें मला कांहीं सुचेना. इतक्या वर्षांनीं आम्ही अचानक भेटलों होतों. आणि अशा स्थितींत भेटलों होतों, कीं काय बोलावें, बोलावयास कशी सुरुवात करावी हा खरोखरच प्रश्न होता. कांहीं तरी बोलावयास हवें म्हणून मीं म्हटलें, " विसू , अरे किती वाळला आहेस ! तुला हल्लीं कांहीं होत तर नाहीं ना ! " त्याचे डोळे भरून आले. पण डोळ्यांतलें पाणी, त्यानें मागें फिरवलें आणि म्हटलें, " भाऊ, तसे नाहीं पण नड आहे म्हणून इकडे धांवत आलों. माझें एक काम तुझ्याकडून होईल का ? "

" अरे, होईल म्हणून काय विचारतोस ? मी तुझा एवढा मोठा भाऊ इथे असतांना तुला कसली काळजी ? तुला कांहीं हवें आहे का ? "

"हो, थोडे पैसे हवेत. दोनशें रुपयांची गरज आहे. तुला सवड आहे?"

विसूनें आपणहून पैसे मागितले आणि नडीच्या वेळीं माझ्याकडे धांव घेतली ह्याचा मला आनंद आणि अभिमान वाटला. थोडेंसें रागावल्यासारखें करून मी त्याला म्हटलें, "अरे, सवड आहे का म्हणून काय विचारतोस? तुझा हक्कच आहे माझ्या पैशावर—"

"भाऊ, मी बोलूं नये. पण वहिनीचा विचार घे."

मी आंत जाऊन सर्व कांहीं तिला सांगितलें. ती कांहींच बोलली नाहीं फक्त हंसली. नेहमीं ताठ्यांत वागणारा विसू लाचार होऊन दारीं आला होता म्हणून ती हंसली हें मीं ओळखलें. मी तिला एवढेंच सांगितलें, कीं मी विसूला पैसे देत आहें. तुला सांगितलें आहे. ह्यावर तिनें विचारलें, "तुमचे तुम्ही मुखत्यार! पण दिलेले पैसे परत येतील ना!" तिचें बोलणें मला आवडलें नाहीं. वाद नको म्हणून मी तिला कांहीं बोललों मात्र नाहीं. शिलकी पैशांतले दोनशे रुपये काढून निमूटपणें त्याच्या हातांवर ठेवले. पैसे घेतांना त्याचे डोळे भरून आले. त्यानें एकदम भाऊ म्हणून हांक मारली आणि म्हटलें, "हे तुझे पैसे मी शक्य तों लवकरच परत करीन. भाऊ होतास म्हणून पाठीशीं उभा राहिलास. भाऊ, तुला कल्पना नसेल, पण ह्या पैशांनीं आज दहा जीव वांचणार आहेत. आतां परत येईन तेव्हां पैसे घेऊन येईन." आणि लगेच विसू निघून गेला. जसा आला तसा गेला. मीही इतका मूर्ख कीं त्याला जेवायला रहा असेंही म्हटलें नाहीं.

त्याचें आणि माझें काय बोलणें झालें तें सारें जानकीनें दाराआडून ऐकलें. मी आंत गेल्यावर तिनें म्हटलें, 'पैसे दिलेत ते दिलेत. पण केव्हां परत येतील तें तरी विचारून घ्यावयाचें होतें आणि चिठीचपाटी नाहीं, तर निदान चारचौघांच्या देखत तरी द्यावयाचे होते.' जनुभाऊ, तुम्हीच सांगा, माणसाच्या स्वभावाला औषध नाहीं; खरें ना?

त्यानंतर पांचसहा महिने निघून गेले. त्या पांचसहा महिन्यांत विसूची कांहींच बातमी कळली नाहीं. जानकी मला वारंवार म्हणे, "आला भावाचा पुळका, दिले पैसे. आपली स्थिति ही अशी. आपल्यालासुद्धां संसार आहे. मुलेंबाळें आहेत. तिनें असें म्हटलें म्हणजे मला, 'तुलाही मुलेंबाळें आहेत आणि हें सारें वहिनीला विचारलें आहेस का!' असें जें विसूनें विचारलें होतें त्याची आठवण होई.

तिनें मला विसूला दिलेल्या पैशांची वारंवार आठवण करावी आणि मी हो हो करून तिला थोपवून धरावें असें किती तरी दिवस चाललें होतें.

पुढें एक दिवस अचानक, विसू फार आजारी आहे असें कळलें. इथून पांचपन्नास मैलांवर असलेल्या खेडेगांवीं कांहीं प्रचाराकरतां तो आला असतां तेथेंच आजारी पडला. तो आजारी असतांना त्याला भेटणें माझें कर्तव्य होतें. समजलेली बातमी जानकीच्या कानीं घालून मी म्हटलें, "मी जाऊन त्याला काय होत आहे तें पाहून येतो. शक्य असेल तर त्याला इकडे घेऊन येतां." ह्यावर ती क्षणभर गप्प राहिली आणि मग कांहीं तरी विचार केल्यासारखें करून म्हणाली, "भाऊजी तसे मानी आहेत. ते कांहीं इकडे येणार नाहींत. बरेच दिवसांत मी सुद्धां त्यांना पाहिलें नाहीं. मीही येतें तुमच्याबरोबर." तिची ही वृत्ति पाहून मला बरें वाटलें. मोठ्या आनंदानें मीं तिच्या म्हणण्याला रुकार दिला.

आम्हीं दोघें विसू ज्या घरीं आजारी पडला होता, त्या घरीं जाऊन पोहोचलों. मला पाहिल्यावर एखाद्या लहान मुलासारखा हुंदके देऊन तो रडूं लागला. त्या तशा स्थितींत मला कांहीं त्याच्याजवळ उभं राहवेना. जानकी मात्र आल्यापासून त्याच्या पायापाशीं बसून होती.

आजार कसला होता तें मला तापडतोब कळणें शक्य नव्हतें. पण अस्थिपंजर विसू डोळ्यासमोर आला, कीं वाटे...

आंत उभे राहणें जेव्हां अशक्यच झालें, तेव्हां बाहेर येऊन मी उभा राहिलों. अशा स्थितींत बाहेर एक चार पांच मिनटें उभा असेन नसेन तों विसूनें एकदम 'भाऊ' म्हणून रडत रडत केविलवाणी हांक मारली.

मी धांवत पळत आंत गेलों. जानकी लगबगीनें बाहेर पडली. त्याच्या बिछान्याशेजारीं उभे राहून त्याला धीर देण्याकरतां मी म्हटलें, "विसू, अरे तूं बरा होशील. रडायला काय झालं ! खुळा कुठचा–"

"नाहीं रे भाऊ, मी मरणाला भीत नाहीं. पण अब्रूला भितों. मरण्यापूर्वीं तुझे पैसे परत करीन तेव्हांच–" बोलतांना विसू एकदम थांबला. त्याच्याजवळ सरकून, त्याचा हात हातांत घेऊन मी म्हटलें, "विसू, अरे असं काय बोलतोस ! मी का कुणी परका आहे ? तुला असें कां वाटलें ? माझ्या पैशाविषयीं मुळींसुद्धां विचार करूं नको. पण आणखी कुणाचे कांहीं देणें आहे का ?--"

"नाही रे भाऊ, फक्त तुझेंच देणें आहे. तीच चूक झाली. भाऊ म्हणून विश्वासानें तुझ्याकडे धांव घेतली, चिठीचपाटीशिवाय तूं पैसे दिलेस आणि मी हा असा तुम्हांला चुकवून—"

मी एकदम त्याच्या तोंडावर हात टेकून म्हटलें, " खुळा कुठचा ! असें कांहीं बोलूं नको. " थोडा वेळ गप्प राहून तो एकदम म्हणाला, " भाऊ, मी कांहीं आतां फार दिवसांचा सोबती नाहीं. ह्या आजारांतून कदाचित बरा होईन पण भाऊ, एक गोष्ट लक्षांत ठेव. तूं जसा अप्पांचा मुलगा आहेस, तसाच मीही अप्पांचा मुलगा आहे. तुझे घेतलेले पैसे...... "

झालेला सर्व प्रकार माझ्या लक्षांत आला. आजूबाजूचे विसूचे मित्र चमत्कारिक नजरेनें आमच्याकडे पाहूं लागले. जानकीला घेऊन मी तावडतोब परत निघून आलों. विसूला तेथें टाकून माघारीं कसा फिरलों, हें माझें मलाच ठाऊक !

आयुष्यांत कधीं बोललों नसेन एवढें मी जानकीला बोललों. त्रागा केला, रागावलों. तूं कोण सैतान आहेस कीं चांडाळीण आहेस म्हणून तिच्या अंगावर धाऊन गेलों. पण ती आपली थंड. एका शब्दानेंही तिनें मला प्रतिउत्तर दिलें नाहीं. पुढें विसू बरा झाला. आणि पुन्हां आपल्या कामाला निघून गेला. झाली गोष्ट माझ्या मनाला फार लागली. विसू आजारी असतांना...जाऊं दे जनुभाऊ, जेवढं सांगावं तेवढं...

कांहीं दिवस असेच निघून गेले. आणि मग एक दिवस......" भाऊसाहेब एकदम थांबले. आणि मग भावनातिरेकानें पुन्हां सांगूं लागले, "पुढें काय ? झालें, संपलें. शेवटीं व्हायचें तेंच झालें. एक दिवस सकाळीं वर्तमानपत्र उघडलें तों काय ! आणि कसें सांगूं--कुठच्या तरी गोळीबारांत माझा विसू—" भाऊसाहेब आतां हुंदके देऊन रडूं लागलें. माझी स्थिति चमत्कारिक झाली. कशा प्रकारें त्यांचें सांत्वन करावें, हें मला कांहीं समजेना.

माझ्याकडे पाहतां पाहतां त्यांनीं इतका वेळ अडकित्याच्या दडपणाखालीं ठेवलेले कूपन हातीं घेऊन मला म्हटलें, "विसू गेला, पण जातांना माझ्या हृदयावर आघात करून गेला. आयुष्यभर तडजोडीसाठीं पुढें केलेला माझा हात परिस्थितीनें वेळोवेळीं मागें खेचला. विसू इतका हुषार पण माझें मन त्याला कळलें नाहीं. नाहीं तर गेल्यानंतर अशा दुःखाच्या डागण्या देऊन जाता ना !......

त्याच्या मृत्यूची बातमी ऐकल्यापासून मात्र जानकीच्या वृत्तींत फरक पडला. पण जनुभाऊ, तिच्या वृत्तींत फरक पडायला केवढा मोठा बळी गेला ! झाली गोष्ट तिच्याही मनाला फार लागली. तिनें माझी माफी मागितली आणि म्हटलें 'खरंच चुकलं माझं !' पण म्हणून का झाली गोष्ट, गेला माणूस परत येतो ? विसू गोळीबारांत गेला, पण मला आपलं वाटतं, कीं मी--आम्ही त्याला मारला.

कारण त्याच्या मृत्यूनंतर चारपांच दिवसांनीं पोष्टमन दाराशीं उभा राहिला. सही करून मीं पैसे घेतले. पोष्टमननें मनिऑर्डरीचें कूपन फाडून माझ्या हातीं ठेवलें आणि माझ्याकडे जळजळीत कटाक्ष टाकून तो निघून गेला.

" जनुभाऊ, आपलें मरण आपल्याला समजत नाहीं. विसूला त्याचें मरण समजलें होतें, दिसलें होतें कीं काय कोणास ठाऊक ? मरणापूर्वीं चारच दिवस त्यानें माझ्या पैशांची फेड केली होती. मनिऑर्डरनें पैसे पाठवून दिले. नुसते पैसे दिले असेंच नव्हे, तर," भाऊसाहेबांनीं किंचित् थांबून माझ्या हातीं कूपन देऊन म्हटलें, " हं, हेंच वाचा तुम्ही—"

मी कूपनवरून नजर फिरवली. मलाही हादरा बसला. कूपनवर विसूनें लिहिलें होतें.

" ती. भाऊ यांस सा. न. वि. वि.

आपणांकडून वर्षापूर्वीं घेतलेले दोनशें रुपये आणि त्याचें तेवढ्या मुदतीचें व्याज मिळून दोनशें वीस रुपयांची रक्कम पाठवीत आहे. स्वीकार व्हावा. ठरलेल्या मुदतीपेक्षां पैसे परत करण्यास विलंब झाला. क्षमस्व, अधिकउण्याची माफी असावी. ती. सौ. वहिनींना नमस्कार.

आपला

विसू "

कूपन भाऊसाहेबांच्या हातीं देऊन मी म्हटलें " खरोखरच हें सारें चमत्कारिक आहे. तुमच्याइतकेंच, पण तुमच्यासाठीं मला वाईट वाटतें. दोष दुसऱ्याचा आणि—"

"तेंच म्हणतों मी, जनुभाऊ ! जानकीवरचा राग त्यानें अशा रीतीनें माझ्यावर काढला. नुसता राग काढून तो थांबला नाहीं. तर दिलेल्या पैशांचें व्याज पाठवून दिलें. माझा पुरता सूड घेतला. सदैव दुःखाच्या

खाईत मला पिचत ठेवलें. ” धोतराच्या सोग्यानें डोळे कोरडे करून भाऊ म्हणाले, “जाऊं दे. आयुष्यांत हें असेंच होतें. ह्या अशा गोष्टी घडल्याच नाहींत असें कांहीं झालेंच नाहीं, अशी आपली मी मनाची समजूत करून घेतों. हें कूपन, आज हातीं लागलें आणि साऱ्या गोष्टींची आठवण... ” बोलतां बोलतां त्यानीं हातांतल्या कूपनचे तुकडे तुकडे केले आणि कुठें तरी टाकण्याकरितां म्हणून ते आंत निघून गेले. मी मात्र सुन्न होऊन, त्यांच्या पाठमोऱ्या आकृतीकडे पाहतच राहिलों !

———

## ३ : सीता

इतके दिवस वाटे, कीं कांहीं विशिष्ट घरांतले लोकच नांवलौकिकाची कद्र करतात— प्रतिष्ठेला जपतात. नुसते जपतात एवढेंच नव्हे तर प्रतिष्ठेचा बाऊ करतात. लोकापवादाला भितात. जें कांहीं करावयाचें तें गुपचूप करूनसवरून वर संभावितपणा मिरवतात. ही वृत्ति केवळ सूज्ञांची शहाण्यासुरत्यांची असावी. किंबहुना, अशा वृत्तीचे जनकच ते असावेत.

माझी ही समजूत कालपरवांपर्यंत दृढ होती. पण गेल्या दोनचार दिवसांत कांहीं गोष्टी कानांनीं ऐकल्या आणि डोळयांनीं पाहिल्या तेव्हांपासून मात्र वाटूं लागलें...

गोष्ट आमच्या गांवांतली आहे. प्रसंग घराजवळ घडला आहे.

मी राहतो त्या घरापासून दोनतीन घरें पलीकडे एक मोठें बंगलीवजा दुमजली घर आहे. आजुबाजूला असलेलीं आमचीं सर्वांचीं घरकुलें बैठी आहेत. इतर बैठ्या घरांत हें दुमदार घर मोठ्या डौलदारपणें उभें आहे. जशी या घराची मान उंच आहे तशीच त्याच्या मालकाची, भैय्यासाहेबांची मान ताठ आहे.

भैय्यासाहेब हे आमच्या गांवांतलें एक बडें प्रस्थ आहे. गृहस्थ चांगला सज्जन आहे. गांवांत स्वतःच्या मालकीची दहापांच घरें आहेत. गांवांतला छापखाना, पिठाची चक्की आणि किराणा मालाची वखार हीं सर्व त्यांच्याच मालकीची आहेत. दोन्हीतिन्ही ठिकाणीं मिळून पांचपंचवीस नोकरचाकर आहेत. नोकर माणसांकरितां, दुमजली घराच्या शेजारींच एक बैठी चाळ आहे.

गांवकरी असे सांगतात कीं भय्यासाहेबांचा हा सारा पसारा अलीकडचा आहे. दहा बारा वर्षांपूर्वी प्रथमच ते इकडे आले. कुठून आले, कुणाला ठाऊक! पण आले ते येतांना बरोबर एक शेलाटी अंगकाठीची छटेल बाई आणि एक घरकाम्या मुनीम, दोघांनाच घेऊन आले. थोड्याच दिवसांत बाई आली तशी निघून गेली आणि पुन्हा केव्हांच ह्या बाजूला फिरकली नाहीं. त्या दिवसापासून महिन्याकाठीं एखाददोनदां भय्यासाहेब नियमितपणें मुम्बई–पुण्याकडे खेप टाकतात. दोन चार दिवस बाहेर राहतात आणि पुन्हां परत येतात. कांहीं कामामुळें मुम्बई--पुण्याकडे जाणें जमलें नाहीं तर मग हरकाम्या मुनीम, बाळकृष्णा, गांवांत एक चक्कर टाकतो. त्या दिवशीं भय्यासाहेबांच्या अंतरंगांतल्या चारपांच शिष्ठांना मोठ्या आग्रहानें बंगल्यावर बोलावण्यांत यत आणि मग त्या रात्रीं पहाटेपर्यंत बंगल्यांतून गाण्या--बजावण्याचे सूर आणि हास्यविनोद ऐकूं येतो. पण हें क्वचित्! महिन्याकाठीं मुम्बई--पुण्याकडची खेप हें आपलें ठरलेलें.

भय्यासाहेबांच्या गैरहजेरींत व्यापारधंद्याची सारी व्यवस्था बाळकृष्णा मोठ्या दक्षतेनें पाहतो. खरें पाहिलें असतां, बाळकृष्णा हुषार आहे असें नाहीं. पण चलाख नसला तरी सांगितलें काम ऐकण्याचा मोठा गुण त्याच्यापाशीं आहे. तसा विश्वासू आहे. नाहीं म्हटलें तरी गेलीं दहाबारा वर्षे तो भय्यासाहेबांचा दिवाणजी आहे. गांवांतल्या घरांचें भाडें वसूल करणें, चक्कीवरचा व्यवहार पाहणें आणि जमाखर्च सांभाळणें हीं त्याचीं कामें. उरला सुरला वेळ मालकाच्या तैनातीला रहावें. इतक्या वर्षांच्या अनुभवावरून वाटतें कीं हीं नेमून दिलेलीं कामें तो चोख बजावीत असावा. तशी भय्यासाहेबांचीहि त्याच्यावर फार मर्जी आहे.

नुसती मर्जी आहे एवढेंच नव्हे तर भय्यासाहेबांचा त्याच्यावर जीव आहे. मला आपलें पहिल्यापासूनच वाटे कीं, ही मर्जी आणि हा लोभ... दारीं बाळगलेलें कुत्रें फार प्रामाणिक आणि लाघवी असलें तर आपला

नाहीं का त्याच्यावर साहजिकच जीव जडत? निर्माण झालेल्या आपुलकींतून आपण नाहीं का कुत्र्याला वेळोवेळीं आंजारूनगोंजारून खूप ठेवीत? त्याच्यासाठीं कांहीं चांगल्या गोष्टी करीत?

वाटे कीं तसेंच बाळकृष्णाच्याहि बाबतींत असावें...

गेल्याच महिन्यांत, भय्यासाहेबांनीं बाळकृष्णाचें लग्न लावून दिलें. साध्या मुनीमाचें लग्न! पण मोठ्या हौशीनें थाटामाटांत झालें. त्यालाहि भय्यासाहेबांशिवाय कुणी नाहीं. तेव्हां मुलगी पसंत करण्यापासून तों देण्याघेण्याच्या व्यवहारापर्यंत सारें कांहीं भय्यासाहेबांनींच उरकलें.

बाळकृष्णाहि नशीबाचा! अशी फक्कड बायको मिळाली कीं, साऱ्यांनीं म्हणावें, "नाहीं बुवा, असा वाण कांहीं गांवात नाहीं."

अंगकाठी ठेंगणी ठुसकी. रुपानें नीटनेटकी. रंगानें काळीसावळी. तुकतुकीत चेहरा. हंसरा, गोल, आकर्षक. एकंदर सुरत अशी कीं वर वर पाहिलें तर वाटावें हें सौंदर्य सौम्य आहे. सुखदायी आहे. नजरेला नजर भिडवून, रोखून पहावें तर जाणीव व्हावी कीं, हे लावण्य उन्मादक आहे, बेचैनी आहे....

हल्लीं हल्लींच भय्यासाहेबांची आणि माझी थोडीफार जानपछान झाली आहे. फार नसली तरी एखादे वेळ बैठकीला बसण्याइतपत!

लग्नानंतर, एका बैठकीच्या रात्रीं भय्यासाहेबांच्या मर्जीतले आम्ही कांहीं लोक इकडच्या तिकडच्या गप्पा छाटीत बसलों होतों. इतक्यांत, आमच्या अंगावरून बाळकृष्णाची बायको—सीता—आंतल्या खोलींत निघून गेली. तिच्या पाटमोऱ्या आकृतीकडे पाहून आमच्यापैकीं कुणी तरी म्हटलें, "तुम्ही कांहीं म्हणा भय्यासाहेब, पण नाकापेक्षां मोती जड आहे..." आम्ही सर्व हंसू लागलों. आमच्या हास्यांत सामील होऊन, हलकेंच शेजाऱ्याला डोळा घालून भय्यासाहेब म्हणाले, "पण ह्या नाकाला तर मोती झेपेल ना?" झालें. आम्ही समजलों. माझ्या आपलें

मनांत आलें कीं विचारा बाळकृष्णा! पण एवढ्यांत कुणीतरी म्हटलें, "भय्यासाहेब तुम्हांलाहि जड जाईल." आतां भय्यासाहेब जिद्दीला पेटले. आपल्या मिस्किल डोळ्यांची एकदोनदां उघडझांप करून ते म्हणाले, "पहा बरं, आजपासून महिन्याच्या आंत आमचा बोभाटा तुमच्या कानीं येईल. आतां मी तसा माणूस नाहीं. पण तुम्ही म्हणतां म्हणून सांगतों कीं पहाच तुम्ही–बाई कशीहि असो या भय्यासाहेबांपुढं..."

"पण भय्यासाहेब, ही सीता आहे–" माझ्या ह्या बोलण्यावर भय्यासाहेब खो खो करून हंसूं लागले. हंसताहंसतांच म्हणाले, "अहो, ही सीता असली तरी बाळकृष्णाची! रामाची नव्हे." भय्यासाहेबांनीं मोठ्या आनंदानें, आव्हानाचा स्वीकार केला. आम्ही उठलों आणि उठतांउठतां बरोबर महिन्यानें भेटावयाचें असें ठरविलें.

बाळकृष्णाच्या बायकोचें मी बारकाईनें निरीक्षण करूं लागलों. दिवसाकाठीं एकदोनदां ती बैठ्या चाळींतून बाहेर पडे. पण बंगल्याकडे फिरकत नसे. ती बाहेर पडे तेव्हां सारे लोक अधाशीपणें तिला पाहून घेत. तिला नुसतें पाहून जेवढें सुख होतें त्यापेक्षां तिला चालतांना, बोलतांना आणि हंसतांना पाहण्यांत जास्त बरें वाटतें असें रसिक एकमेकांना सांगत. तिच्या चालण्याची, बोलण्याची आणि हंसण्याची एक विशिष्ट ढब होती. चालत्या बोलत्या तिच्याकडे पाहून मलाहि वाटे कीं, या सौंदर्यांत एक तऱ्हेची अपूर्वाई आहे. विशिष्ट गोडी आहे. आपल्याकडे इतर पाहतात, एवढेंच नव्हे तर आपल्या सौंदर्याचें कौतुक करतात या गोष्टीची जाणीव तिला असावी असें वाटतें. अशी जाणीव असलेली, त्याचा अभिमान बाळगणारी पण लोकांपासून अलिप्त राहूं इच्छिणारी स्त्री नजरेला नजर केव्हांच भिडवीत नाहीं. नाकासमोर पाहून चालते. सीतेचीहि हीच रीत. तसेंच कुणी ओळखीचें भेटलें तर थोडें हंसावयाचें, कुणी बाईमाणसानें फारच सलगीनें अडविलें तर थोडा वेळ थांबावयाचें!

बस्स. एवढेंच. ह्याच्यापलीकडे कांहीं नाहीं. बाईची ही रीत पाहून मला वाटे कीं, बाई चांगली गरती आहे. माझ्याचप्रमाणे कांहीं म्हणत कीं ती कुलशीलाची आहे. तिला रीतरिवाज ठाऊक आहे. पण कांहींचें म्हणणें असें कीं दाम खोटा आहे. फसवा आहे. उगाच सभ्यतेच्या पांघरुणाखालीं गुरफटलेला आहे.

पाहतां पाहतां महिना निघून गेला. पण कांहीं झालें मात्र नाहीं. विशेष असा कांहीं बोभाटा कानीं आला नाहीं. वाटलें कीं, भय्यासाहेब विसरले असावेत नाहींतर त्यांचें कांहीं चालत तरी नसावें. पण नाहीं. ज्या दिवशीं बरोबर महिना झाला त्याच दिवशीं त्यांनीं आम्हाला बंगल्यावर बोलावून घेतलें आणि म्हटलें,

"आज महिना झाला. मुदत संपली. कबूल. पण एक चार दिवस आणखी हवेत." झाले. चार दिवस आणखी देण्यांत आले.

दुसऱ्या का तिसऱ्याच दिवशीं, भय्यासाहेबांनीं, म्हणे, तांतडीनें बाळकृष्णाला बंगल्यावर बोलावून घेतलें. त्यांना एवढें संतापलेले त्यानें पूर्वी केव्हांच पाहिलें नव्हते. थरथर कांपत तो समोर उभा होता. भय्यासाहेबांनीं त्याच्यापुढें जमाखर्चाच्या चोपड्या फेकल्या आणि म्हटलें, "इतकीं वर्षे तुझ्यावर विश्वास टाकला आणि तूं मात्र साफ गळा कापलास." बाळकृष्णाला कळेना कीं आपल्या हातून असा गुन्हा झाला तरी कोणता? तरी पण भय्यासाहेबांच्या एकंदर आविर्भावावरून त्याला वाटलें कीं, आपलें कांहींतरी खास चुकलें असावें. अक्षम्य असें कांहींतरी गफलतीनें घडलें असावें. त्यानें हात जुळवले आणि डोळयांत पाणी आणून म्हटलें',– पण त्याला जें म्हणायचें होतें तें नीटसें म्हणतां आलें नाहीं.

रागावलेले भय्यासाहेब एकदम शांत झाले. बाळकृष्णाला त्यांनीं जवळ बोलावले आणि आवाज पाडून म्हटलें, " मोठा भयंकर माणूस आहेस

तूं ! तुझ्या गफलतीनें माझें केवढें नुकसान झालें कांहीं कल्पना ? आतां तूंच आहेस म्हणून, नाहींतर दुसरा कुणी असता तर सरळ चावडीवर खेंचला असता. कमीतकमी वर्ष सहा महिने—"

बाळकृष्णाच्या डोळ्यांसमोर काजवे चमकले. थरथर कांपत तो म्हणाला, " नको–नको. तेवढंच नको. इतकीं वर्षं चाकरी केली. आतां हा टपका नको. अब्रून जगूं दे. उजळ माथ्यानें वावरूं दे. " भय्यासाहेबांनीं पुन्हां अवसान आणले. बोलले, " आतां तूंच सांगतो आहेस म्हणून... पण आतां या गुन्ह्यांतून सुटायला एकच वाट आहे..."

" सांगा धनी, काय लागेल तें सांगा. सांगाल तें ऐकेन. पण वांचवा."

" प्रकरण कोर्टदरबारीं गेलं नाहीं. पाहिजे... "

" नको नको. तेवढंच बोलूं नका. "

" मग असं कर. हें पहा, तुझं नुकतंच लग्न झालं आहे. बायको तरुण आहे. सुंदर आहे. बाई उफाड्याची आणि त्यांतून गांवांतले लोक टवाळ. तूं हा असा ! " भिला आणि लाचार बाळकृष्णा भय्यासाहेब काय सांगतात तें कान टवकारून ऐकूं लागला. भय्यासाहेबांनीं त्याच्याकडे रोखून पाहिलं आणि म्हटलं, " मी सांगेन त्याचा नीट विचार केलास तर तुझं तुलाच समजेल. मी सांगणार आहे त्यांत विशेष असें कांहींच नाहीं. मला आपलं वाटतं, तूं सीतेला घेऊन बंगल्यांतच रहायला ये. घरांत बाईमाणसाचा हात फार दिवसांत फिरलेला नाहीं; म्हणून कसें भकास वाटतें. उदास दिसतें. त्रासल्यासारखें होतें. आपण तिथे एकत्र राहूं. "

" पण हें लोकांत ठीक दिसणार नाहीं —."

" पण आपल्याला लोकांशीं काय करायचं आहे ? विचार कर. सीतेचा सल्ला घे. काय तें ठरव आणि उद्यांपासून इकडेच रहायला या—"

बाळकृष्णा जागच्या जागीं उभा राहिला. सुन्न. काय करावें कांहीं कळेना. रागारागांत घरीं आला व सीतेला बोलला, " हें गांव सोडून जायचं.

पळून जायचं. आजच्या आज. चल आटप. पाहतेस काय अशी ? " सीता आश्चर्यानें पहातच राहीली. तिला कळेना कीं एकदम असें झालें तरी काय ? तिनें धीर करून विचारलें, " पण असें झालें तरी काय ? " बाळकृष्णानें घडला प्रसंग तिच्या कानीं घातला आणि म्हटलें, " काय वाटेल तें झालें तरी चालेल. पण मी हें सहन करणार नाहीं. लोक काय म्हणतील ? दिसायला किती घाईट दिसेल...पण आतां ह्यांतून सुटायचं कसं—" आणि बाळकृष्णा ओक्साबोक्शीं रडूं लागला.

सीतेनें कांहींतरी निश्चय केला. आपली स्थिति आणि आपल्या नवऱ्याचा वकूब ध्यानीं घेतला आणि त्याला म्हटलें, " थांबा, मीच भेटतें त्यांना. "

" नको नको. तूं भेटूं नकोस —"

" नाहीं, मीच भेटतें. तुमच्यानें जमणार नाहीं. जाते नि विचारतें त्यांना. त्यांच्या प्रश्नाला मीच देतें उत्तर. "

" असं सांगणार तरी काय तूं ?--"

" तुम्हांला कळायचं नाहीं. वेळ आली तर दोन थोबाडींत मारीन आणि सांगेन...."

" नको नको तुझ्या पाया पडतो---"

" मग होऊं दे तर नाचक्की ! आतां तोंड उघडलं नाहीं तर उद्यां तोंड नको काढायला गांवांत—"

" मला कांहीं कळत नाहीं. तूं भेट. भेट तूं आणि सांग...पण--"

" पण काय ? आम्ही तिकडे रहायला येतों असं म्हणेन असं वाटलं कीं काय तुम्हांला ? तुमची बायको आहे मी. हाडापेरानं दणकट आहे. तशीच मनानंहि आहे. माझं नांव सीता आहे—"

सीतेनें विचार केला. मनाशीं खूणगांठ बांधली आणि भय्यासाहेबांची भेट घेण्यासाठीं ती आली. तिला पाहून भय्यासाहेब चमकले, तेव्हां ती

हंसली आणि बोलली, " आलें आहे.... "

" बाळकृष्णानें सांगितलं वाटतं तुम्हांला—"

" हो—"

" मग ? नीट सांगितलें ना त्यानें ? तसं माझ्या मनांत अजीबात पाप नाहीं. "

" हो--मला माहीत आहे तें. म्हणूनच मी आल्यें. "

सीता त्यांच्या नजरेंत नजर घालून बोलूं लागली, " त्यांना ह्यांतलें कांहीं कळत नाहीं म्हणून मीच आलें. त्यांना न पाठवतां मीच आलें. ह्यांतच तुम्ही काय तें समजा. " क्षणभर ती थांबली. पुढें सरकली आणि पुन्हा एकदां हंसून बोलली, " समजलें ना ! पण माझीहि एक अट आहे. ही गोष्ट लोकांना आणि विशेषतः माझ्या नवऱ्यालासुद्धां कळतां नये. आतां या तुमच्या बंगल्यांत रहायला यायचा त्यांना आग्रह नका करूं. "

आणि भय्यासाहेबांनीं दुसरे दिवशींच दोस्त लोकांपुढें जाहीर केलें, " आपण हरलों. सीता मोठी जबरदस्त बाई आहे. कुलशीलाची दिसते. नांवाप्रमाणें आहे ही सीता. "

पण आश्चर्य असें कीं, मला मात्र भय्यासाहेब हल्लीं टाळतात. कधीं भेटलेच तर नुसते हंसतात.

---

# ४ : सावत्र आई

कुणाचाही दोष नसून कधीं कधीं अशी विचित्र परिस्थिति निर्माण होते !—अंतःकरण व्यथित होतं—हृदयांत खळबळ उडते अन् मनांत नाहीं नाहीं ते विचार थिंगाणा घालूं लागतात. अशा वेळीं आपण परिस्थितीवर चिडतों—कावतों ! आणि मला वाटतं, दुबळा माणूस परिस्थितींवर चिडण्यापेक्षां दुसरं काय करूं शकणार ?

परिस्थितींतून बाहेर पडण्यासाठीं थोडी धडपड करावी—जरा हातपाय हलवावे, पण कोळ्याच्या जाळ्यांत अडकलेला कीटक कधीं तरी बाहेर पडतो का ?—परिस्थितीनं कावलेलीं कितीतरी माणसं !— माणसांचे मोगाडे रोज माझ्या दृष्टीसमोरून बाजूला होतात. कित्येक तेंच जीवन जगत आहेत ; आणि कित्येकांवर परिस्थितीनं मात केली आहे. कित्येक कुटुंबांची धुळधाण उडाली आहे—होत्याचं नव्हतं करण्यांत परिस्थितीला कांहींच वाटत नसावं !

मी सांगणार आहे ती गोष्ट अशीच आहे !—ह्या घटनेंत दंभ नाहीं, कलेचा साज नाहीं कीं चटकदारपणासाठीं शब्दांचा फुलोरा नाहीं ! जसं घडलं तसं मूर्तिमंत सत्य !

ही गोष्ट सांगण्याचं सुद्धां तसं कांहीं कारण नव्हतं. पण संध्याकाळी घडलेला तो प्रसंग !—भावनावश अंतःकरणाला राहवत नाहीं हेंच खरं !

चिंतोपंतांना नवीन घर पाहायचं होतं. जागा बघण्यासाठीं मी त्यांच्या-बरोबर त्या घरीं गेलों. सुमारें वीस वर्षांपूर्वी ह्याच घरांत मी भाड्यानं राहत होतो. दुसऱ्या बाजूला दामुअण्णा मास्तर ! अन् मास्तरांच्या पलीकडे मास्तरांचा भाऊ शामराव ! चिंतोपंत घराचा कोपरान् कोपरा

पाहत होते. घर दाखवणारा आमच्या बरोबरचा इसम प्रत्येक खोलीचें वैशिष्ट्य आम्हाला सांगत होता.

त्या बिच्याऱ्याला कल्पनाही नसेल कीं, वीस वर्षांपूर्वी तें सर्व घर माझं पाहून झालं होतं! चिंतोपंत परसूं बघण्याकरितां घराबाहेर पडले. "घर पाहून झालं पण विहीर कुठें आहे? —" चिंतोपंतांनीं रास्त प्रश्न विचारला होता.

घर दाखवणारा इसम एक क्षणभरच चपापल्यासारखा झाला. माझ्या तीक्ष्ण दृष्टीतून तें सुटलं नाहीं, विहीर पाहण्याकरितां चिंतोपंत पुढें झाले, त्यांच्या पाठोपाठ मी विहिरीच्या कठड्यावर आलों.

चिंतोपंत विहिरींत डोकावून पाहत होते; बरोबरचा इसम चिंतोपंतांना माहिती पुरवीत होता—"विहीर खोल असली तरी पाणी केव्हांच आटत नाहीं. पाणी तर असं गोड! —अडसराच्या पाण्यालासुद्धां लाज वाटेल, हा हातरहाट, पलीकडे बैलरहाट—पाणी अगदीं घरांत पडतं!"

मला पटकन् हंसूं आलं! एक वैगुण्य लपविण्याकरतां माणसाला किती गोष्टी सांगाव्या लागतात!

चिंतोपंत विहिरींत अजूनही डोकावून पाहत होते. "वापर दिसत नाहीं पाण्याला. आंत घाण सांचलेली दिसते! बाजूला हीं औदुंबराचीं मुळं! आणि फारच खोल आहे विहीर—छेः मुलांबाळानां भीतिच वाटायची!" अंग शहराल्यासारखं करून चिंतोपंत चटकन् मागें झाले.

आमच्या बरोबरच्या इसमाचा चेहरा पाहण्यालायक झाला होता. माझी दृष्टि टाळून तो दुसरीकडे पाहूं लागला.

"भाऊराव, तुम्हीच पाहा बरं! पाहा एकदां विहिरींत डोकावून —" चिंतोपंतांनीं मला आंत वाकून पाहण्याविषयीं सूचना केली. बिचारे चिंतोपंत!—त्यांना कल्पनाही नव्हती कीं, ह्या विहिरीचा भाग अन्

भाग मला टाऊक आहे ! " भाऊराव, ऐकलंत ! विहिरीविषयीं मी फार साशंक आहे—आमची मेहुणी ह्याच गांवीं होती म्हणे—कधींच पाहिली नव्हती तिला मी ! गेली बिचारी !—कुटच्याशा विहिरींत उडी टाकून—"

चिंतोपंतांकडे मी दिङ्मूढ होऊन पाहूं लागलों. ते सांगत असलेलं प्रसंग !—बरोबर वीस वर्षांपूर्वी—

"—आणि म्हणूनच—भाऊराव, खोल विहीर म्हटलं कीं मी घाबरतों. सबंध आयुष्य गेलं ; आतां राम राम म्हणत स्वस्थ बसायचं ! अशा वेळीं तरी पोरांबाळांची काळजी नको. परसांत अशी खोल विहीर असली कीं साहजिकच माझा जीव टांगलेला—आणि पाण्याला वापर दिसत नाहीं. कांहीं कारण तर नाहीं ना ?—" नेमका नको तोच प्रश्न चिंतोपंतांनीं विचारला होता. मी गप्प होतों—

खरी गोष्ट आपोआप बाहेर पडत होती—

" तसं कांहीं कारण आहेच असं नाहीं—पण—"

चिंतोपंतांनीं डोळे विस्फारले. " तरी मला वाटलंच ! ह्या कोंकणच्या विहिरी—कांहीं भानगड असेल. कांहीं म्हणा तुम्ही भाऊराव पण मी विहीर पाहिल्याबरोबरच काचळलों. मला वाटलंच होतं—"

" तसं कांहीं घाबरण्यासारखं नाहीं—"

" पण आहे तरी काय ?" चिंतोपंतांनीं आमच्याबरोबरच्या इसमाकडे रोखून पाहिलं. त्याची स्थिति मेल्यासारखी झाली होती.

" तसं कांहीं विशेष नाहीं—उगाच लोकापवाद ! अमावास्येच्या रात्रीं म्हणे कांहीं आवाज ऐकूं येतो—"

जितक्या उत्साहानं चिंतोपंत विहीर बघण्याकरतां चौथऱ्यावर चढले होते तितक्याच निराशेनें किंबहुना त्याहूनही जास्त निराशेनें ते भरभर चौथऱ्याच्या पायऱ्या उतरून अंगणांत आले. " चिंतोपंत, तसं घाबरण्यासारखं कांहीं नाहीं—"

" आवाज येतो म्हणतां अन् वर सांगतां घाबरण्यासारखं कांहीं नाहीं ! आवाज तरी काय येतो ? "

सांगावं कीं सांगूं नये, ह्या पेंचांत बरोबरचा इसम पडला असावा. त्याच्या चेहऱ्यावरचे भाव क्षणाक्षणाला बदलत होते. " आवाज म्हणजे तसा कांहीं रोज येत नाहीं. फक्त अमावास्येच्या दिवशीं–! "

" म्हणूनच घाबरण्यासारखं–छे ! छे ! आम्ही मुंबईचीं माणसं–नुसतं ऐकूनच आमच्या अंगावर शहारे येतात. "

" चिंतोपंत, मी सांगतों तुम्हाला–" इतका वेळ कांहीं न बोलतां मी गप्प होतों. पण शेवटीं मला राहवेना. तो वीस वर्षांपूर्वीचा करुण प्रसंग ! विहिरीच्या पाण्यांत तिन्हीसांजां उठलेली ती भीषण किंकाळी !

" तसा आवाज काय येतो तें कळत नाहीं–पण विहीरींत भांडें बुडतांना जसा आवाज होतो—तसा आवाज—माणसाचा आवाज— पण शब्द कांहीं उमटत नाहींत ! "

नाहींतरी मी खुलासा करणारच असं पाहून बरोबरच्या इसमानं पटकन् संदिग्ध सांगून टाकलं होतं—

" एकूण ही विहीर फार रहस्यमय दिसते—! " चिंतोपंतांनीं आधींच मोठे असलेले डोळे रुंद करून गरगरा फिरवले.

" बसा चिंतोपंत—मीच सांगतों सारी हकीगत !—" ह्यावर सारी गोष्ट मी चिंतोपंतांना सांगूं लागलों—

वीस वर्षांपूर्वींची गोष्ट !—कदाचित् कुणी आतां विश्वासही ठेवणार नाहीं—वीस वर्षांपूर्वीं ह्याच घरांत मी भाड्यानं रहात होतो म्हणून मला तरी ठाऊक ! आमच्या बिऱ्हाडाला लागून दामुअण्णा मास्तर अन् मास्तरांच्या पलीकडे शामराव—

परिस्थितीनं दामुअण्णांना गिळलं—! तसं पाहिलं तर अण्णा देव-माणूस !— कुणाच्या आल्यांत नाहीं कीं गेल्यांत नाहीं. आपली शाळा

बरी कीं आपण बरं! घरांतल्या भांडणांना कंटाळून भावाभावांनीं शेजारीं शेजारीं संसार थाटला. दोन भाऊ एकमेकांवर जिवापलीकडे प्रेम करीत—पण दोघांच्या बायका !— त्यांच्यामुळंच एका चुलीवर शिजणारं अन्न दोन चुलींवर शिजूं लागलं !

दामुअण्णांचं पहिलं कुटुंब कुठल्याशा सांथीला बळी पडलं! तिच्या पाठीमागं–दहाबारा वर्षांचा अण्णांचा मुलगा सदू—

अण्णा सदूवर जिवापलीकडे प्रेम करीत, सदूसाठीं दुसरं लग्न करायला सुद्धां ते तयार नव्हते. पण मग मीच एक दिवस अण्णांना सांगितलं –" अण्णा, असे संन्यासी किती दिवस राहणार तुम्ही?–झाली गोष्ट होऊन गेली. सदूकडे पहा–चार घास पोराला मिळाले पाहिजेत–तुम्हांला सुद्धां!"

अन् मग गणपतीपुळ्याला जाऊन एक दिवस अण्णा सदूला आई घेऊन आले!

शेजाऱ्यापाजाऱ्यांना नवा विषय मिळाला. 'अण्णांची नवी बायको! 'सदूची सावत्र आई—,' 'दुसरेपणाची बाईल—',' अण्णांचं अंगवस्त्र!' लोकांच्या जिभेला हाड नसतं ही गोष्ट खरी, पण नात्यांतलींच माणसं जास्त पुढं जाऊन वाटेल तें बरळतात हें त्याहून जास्त खरं!–

अण्णांच्या नव्या संसाराला सुरवात झाली. लोकांना चेव आला. लोकांत अण्णांची जुनी मोलकरीण अन् शामरावाची बायको, अण्णांची भावजय, हिरिरीनं भाग घेऊं लागली.

अण्णांची दुसरी बायको—'माई'—बाहेर पडल्या कीं कित्येक डोळे बाहेर पाहूं लागत. अण्णांच्या भावजयीनं स्वतःच्या बिऱ्हाडांत राहून माईवर ताशेरे झाडावे. माईंना ऐकूं जाईल एवढ्या बेतानं तिनं म्हणावं, "सखू, कुठं पहिल्या जाऊबाई अन् कुठं ह्या!— तूं कांहीं म्हण, पण भाऊजींनीं उसांत जाऊन वाड सोधलं. त्यांना काय दुसरी बायको

मिळाली नसती ! मी तिची एवढी जाऊ! पण कधीं बोलते का आपणहून माझ्याजवळ ? पहिल्या जाऊबाई तर दिवसांतून दहापांच वेळां तरी माझ्याकडे येत. कांहीं काम नसलं तरी नुसत्या हांक मारून जात. पण हिचं पाहावं तो सारंच उलट ! तिला म्हणावं एवढं तोऱ्यांत नको कांहीं वागायला—काळ आहे वेळ आहे ! ”

सखू मोलकरणीनं मालकिणीला खुष करण्याकरतां मान डोलवावी अन् म्हणावं, “ जानकीकाकू, नाहीं तरी मी तेंच म्हणतें. कुठं पहिल्या वहिनी आणि कुठं ही अवदसा ! लुगडें धुवायला रोज मी जातें—पण कधीं चहाचा थेंब तरी ! तेंच वहिनी होत्या तेव्हां कधीं माझा चहा चुकला नाहीं. ”

हीं बोलणीं ऐकून मला मात्र हंसूं येई. जानकीकाकू पहिल्या जाऊबाईचे गोडवे गात होत्या—पण ती जिवंत असतांना त्यांनीं तिला कशी छळली होती हें मीं डोळ्यांनीं पाहिलं होतं. दोघी जावांचं जर एवढं सूत होतं तर वेगवेगळीं बिऱ्हाडं करण्याचं काय कारण होतं ?

तेंच सखू मोलकरणीचं ! वहिनींच्या घरीं रोज चहा पिऊन त्यांच्या-पाठीमागं ती काय बरळत असे हें सारं मला ठाऊक आहे.

सदू तर दहाबारा वर्षांचा कोंवळा पोर !—स्वतः विचार करून स्वतः-च्या तंत्रानें वागण्याची अक्कल नाहीं. लोक सांगतील तें ऐकायचं ! त्यावर विश्वास ठेवायचा आणि तसं वागायला सुरवात करायची—

जानकीकाकूंनीं सदूला हाताशीं धरला. सदूला जवळ घेऊन त्या विचारीत, “ माझा राजा, तो !—विसरलास वाटतं तुझ्या आईला—कधींच येत नाहीं का रे आठवण ? ” सदूला गहिंवरून येई. डोळे तरारून येत. मग काकू सदूला मानभावीपणानें कुशींत घेत अन् म्हणत, “ अशी घेते का रे तुला कधीं तुझी नवी आई जवळ ?—माझा गुणी बाळ तो ! ”

सदूच्या बालबुद्धीला काकूंचं दुटप्पी धोरण कळणं शक्य नव्हतं. घरांतली बारीकसारीक माहिती सदूमार्फत काकूंना कळत होती. दुसऱ्याचं वाईट चिंतणाऱ्या, विनाकारण दुसऱ्याला त्रास देणाऱ्या काकूंच्या स्वभावाला भरपूर खाद्य मिळत होतं—

काकू रोज सदूचे कान फुंकूं लागल्या. असत्य गोष्ट सातत्यानं मनावर बिंबवल्यानं ती खरी वाटूं लागते. त्यांतून बाल वय! कारण नसतां सदू घरांत तुसड्यासारखा वागूं लागला. माईंना सदूच्या वर्तनाचा उलगडा होईना. हळूहळू सदू माईंना उलट उत्तरं देऊं लागला. कांहीं गोष्ट झाली कीं सदू काकूंनीं शिकविलेलं वाक्य, "माझी आई असती तर!" माईंच्या तोंडावर फेकूं लागला.

माई खूप विचार करीत!—"जाऊबाई अशा कां बोलतात? मीं त्यांचं काय वाईट केलं? सदूला असें विचित्र वागायचं कुणीं शिकवलं! कधीं कधीं तो इतकं लागट बोलतो. कुणी शिकवीत तर नसेल ना त्याला?" माईंना काकूंची शंका येई—पण न बोलतां गप्प बसण्यावांचून गत्यंतर नव्हतं. "सदू आपल्याला कांहीं लागट बोलला कीं सखू अशी भेदक हंसते! त्या हंसण्यानं त्याला जास्तच चेव येतो. दोन थपाटे देऊन गप्प बसवावं तरी तें आपल्या हातांत नाहीं. आपण जरा कुठं हात लावूं अन् अर्थाचा अनर्थ होईल! खायला घालायची सत्ता आपली—पण—"

दामुअण्णांना ह्या साऱ्या गोष्टी कळत होत्या. डोळ्यांनीं ते पाहत होते अन् कानांनीं ऐकतही होते. अण्णा विचार करीत—"आपलेच दांत आणि आपलेच ओंठ!—आपलीच भावजय!! काय बोलायचं? उगाच हंसूं मात्र व्हायचं लोकांत. एखादा शब्द बोललों तरी, 'लागला बायकोची कड घेऊन भांडायला' असं म्हणायलासुद्धां ती कमी करणार नाहीं."

दिवसेंदिवस अण्णा लोकांत कमी मिसळूं लागले. घरच्या घरीं ते स्वस्थ पडून राहूं लागले. त्याचा सुद्धां विचित्र अर्थ घेऊन लोकांनीं म्हटलं होतं, "अण्णा कुठं बाहेर दिसत नाहींत हल्लीं? चुलीजवळ बसत असतील दुसरं काय!—नवी नवाळ आहे—"

असाच एकदां घडलेला प्रसंग! केवढा बाऊ केला काकूंनीं त्याचा–अण्णा शाळेंतून परतत होते. माई देवळांतून बाहेर पडल्या. साहजिकच अण्णा अन् माई बरोबरीनं घरीं आलीं.

काकूंना हे महिनाभर पुरलं होतं. "इश्श! भाऊजींनींसुद्धां ताळतंत्र सोडला–लहान का आतां भाऊजी! ह्या वयांत शोभतं का हें! चक्क बरोबर फिरायला घेऊन जातात. भाऊजींचं चुकलं, पण हिला तरी कळायला हवं–नाचरी मेली! पहिल्या जाऊबाई नव्हत्या अशा नाचत—"

पुढं पुढं काकूंनीं सदूला दुसरीच गोष्ट शिकवली. मधल्या खोलींत सदूच्या आईचा फोटो टांगला होता. सदू त्या फोटोसमोर उभा राही अन् अण्णांना विचारी, "अण्णा, कुठं आहे हो ही माझी आई! ती असती तर बरं झालं असतं नाहीं?"

अण्णांना हें असह्य होई. पूर्वस्मृति तरारून त्यांच्यापुढं उभ्या रहात. अण्णा कावेरबावरे होत. माईनीं हें सारं पाहिलं. सदूच्या दृष्टीआड तो फोटो व्हावा म्हणून अण्णांच्या संमतीनं त्यांनीं फोटोची जागा बदलली. माईंची एकच इच्छा होती. "झाली गोष्ट होऊन गेली. आतां फोटोकडे पाहून तरी ह्यांना वाईट वाटूं नये—"

फोटोची जागा बदलली ही गोष्ट काकूंना कशी कळली कुणास ठाऊक! जाऊबाईकडे कधीं न फिरकणाऱ्या काकू दुपारीं घाईघाईनें माईकडे आल्या. माईना आश्चर्यच वाटलं. "बसा—"

"छे:, बसायला वेळ नाहीं. एक काम होतं—" प्रश्नार्थक चेहरा करून माईनीं काकूंकडे पाहिलं.

" तसं कांहीं विशेष नाहीं. जाऊबाईची आठवण झाली. फोटोशिवाय दुसरं आतां काय पाहणार?—म्हटलं तुमच्या खोलींत आहे. एकदां पाहून यावं—" बोलतां बोलतां काकूंनीं डोळ्याला पदर लावला.

" पहा ना—" माई पुढं सरल्या. काकू झटकन् पुढं झाल्या. " दिसत नाहीं कुठं जाऊबाई—भाऊजींनीं ह्या खोलींत मुद्दाम लावला होता डोळ्यांसमोर असावा म्हणून—"

" तिथं नाहीं—ह्या खोलींत आहे—"

" इश्श! बाईचा फोटो अन् अशा अडगळीच्या खोलींत!" फोटो न पाहतां काकू फणकाऱ्यानं बाहेर पडल्या. घरीं जाऊन काकूंच्या तोंडाचा पट्टा सुरू झाला. " बाई! बाई! शर्थ झाली स्वार्थीपणाची-सवत झाली म्हणून काय झालं? सवतीचा फोटो कांहीं अडगळीच्या खोलींत नको लावायला. जड झाला असला तर दे म्हणावं माझ्याकडे धाडून—"

ह्यावर माई दोन दिवस रडत होत्या. रडून रडून माईचे डोळे लाल झाले होते. अण्णांना कुठच्याच गोष्टीचा उलगडा होत नव्हता.

छे:! माणसानं जगांत दुबळं असूंच नये. निदान ढकास मह्याठक तरी—पण बिचाऱ्या माई! बिचारे अण्णा!!—

दैवानं पुरता सूड उगवला.

सदूला ताप भरला. नशीब बिचाऱ्याचं! ताप आणि तोही विषमाचा—!

माईची घालमेल चालू होती. अण्णा कावरेबावरे झाले होते. तापाचा तेरावा दिवस होता. " आग-आग-" सदू मधेंच ओरडायचा प्रयत्न करी. माइनीं कांशाची वाटी घेऊन पाय चोळायला सुरवात केली. तेवढ्यांत सखू आली. " अगबया-माई, अण्णाची वंशवेल ही!-कांशाच्या वाटीनं कशाला हवेत पाय घांसायला! हात लावा कीं-" माई निमूटपणं पाय घांशीत होत्या. अशा कुजक्या बोलण्याची त्यांना संवय झाली होती.

सखू बाहेर पडली. काकू दरवाजांत आल्या. सखूच्या बोलण्याची पुन्हां पुनरावृत्ति व्हायला नको म्हणून माईंनीं चटकन् हातांनीं पाय घांसायला सुरवात केली. "बाई–बाई! काय तरी ढोंग! इतका वेळ वाटीनं पाय घांशीत होती. मला पाहिल्यावर लागली हातांनीं घांसायला–"

माई बावरल्या, गोंधळल्या–भेदरल्या–! इकडे सदू मृत्युशय्येवर! इकडे अशीं कुसकीं नासकीं बोलणीं!

बावरलेल्या मनःस्थितींत सदूला औषधाचा डोस देण्याकरतां माईंनीं बाटलीचं बूच काढलं—

शेजारीं शेजारीं कोनाड्यांत दोन बाटल्या होत्या. एक छातीला चोळण्याच्या विषारी औषधाची आणि दुसरी पोटांत घेण्याच्या औषधाची.

गोंधळलेल्या माईंनीं विषाच्या बाटलीचं बूच काढलं होतं. माई कपांत औषध ओतीत होत्या—औषध किती झालं हें बघण्याकरितां माईंनीं बाटली वर उचलली.

शेजारींच बसलेल्या अण्णांची बाटलीकडे झटकन् नजर गेली. जवळजवळ ओरडतच अण्णा वर उठले.

काकू—सखू—पाहतच राहिल्या...

"दोन तास तरी जगूं दे पोराला. चक्क विष पाजतेस त्याला–धांदरट कुठची! लक्ष कुठाय्–" कावलेल्या अण्णांच्या तोंडून वाटेल ते शद्ब बाहेर पडत होते—

'खळ्ळ' माईंच्या हातून कप गळून पडला. "अग बाई—विष पाजते पोराला—बाई—बाई!—" काकू वाटेल तें बडबडूं लागल्या. सखू हातवारे करून काकूंना साथ करूं लागली. बिचाऱ्या माई!—

सारं असह्य होऊन माई धांवत धांवत बाहेर आल्या. करकरीत अमावास्येच्या तिन्ही सांजा!–मागचा पुढचा विचार न करतां माईंनीं पोराला मीं मारलं असं कुणीं म्हणायला नको अन् ह्यावर माईंची उडी–!

सदूची सावत्र आई ' माई ' आपल्या त्रासदायक जीवनांतून मुक्त झाली !

—आणि काळ आपला ' सूड ' अनेक तऱ्हेनें उगवतो.

—त्या दिवसापासून सदूला उतार पडला !

' माईच्या मृत्यूमुळें ' काकूंचें समाधान झालं होतं. आतां त्या सदूशीं पूर्वींच्या आपुलकीनें वागत नव्हत्या.

तरीही एक दिवस सलगीनें सदू काकूंच्याकडे गेला. काकू तिरस्कारानें त्याच्याकडे पहातं पहातं म्हणाल्या, " कारटंच मेलं दळभद्री आहे ! सख्खी आईही मेल्यानं गिळलीन् आणि सावत्र आई सुद्धां—माईनं सुद्धां—किती कष्ट केले या कारट्याचें—पण म्हणतात ना—"

सदूच्या डोळ्यांत अश्रु उभे राहिले. तो ताडकन् आपल्या घरीं आला. अण्णा तिथेंच उभे होते. सदूनें अण्णांच्या अंगाला मिठी मारली. दोघेही एकमेकांकडे केविलवाणें पाहूं लागले.

काकूंना तें दृश्य दिसलें—आणि समाधानानें त्या केवढ्यांदा तरी हंसल्या.

" माझीच हो—माझीच महुणी ती ! पाहिली सुद्धां नव्हती तिला मी. तिनं जीव दिला असं लोक म्हणत—तीच ही विहीर—किती विचित्र ! "

आणि ज्या ज्या वेळीं मी विचार करतां त्या त्या वेळीं मला वाटतं कीं, कुटुंबांत कोणाचाही दोष नसतांना—परिस्थिति कांहीं आयुष्यांची कशीं धुळधाण उडवते !—

# ५ : चुरस

कांहीं माणसांना घडलेल्या गोष्टीपेक्षां त्या गोष्टींच्या स्मृतीच जास्त प्रिय वाटतात! कॉटवर आडवं व्हावं, मानेखालीं सावरीची मऊ मऊ उशी सरकवावी, छातीपर्यंत दुलई अंगावर ओढून घ्यावी, डाव्या हातांत पुस्तक धरावं, उजव्या हाताच्या चिमटींत संथपणें पेटणारी सिगारेट पकडावी.... आणि बेहोष होऊन, गतकालच्या विचित्र पण गोड धुंदींत मशगूल होऊन जावं! अशा वेळीं स्मृतींवर अमृताचा शिडकाव होतो आणि त्या जास्तच गोड वाटूं लागतात.... कटु स्मृति जाणूनबुजून डोळ्याआड केल्या जातात! कदाचित् त्या उफाळून आल्याच तर त्यावर सोनेरी मुलामा चढतो आणि ह्या गोष्टी सुसह्य होतात!....

बाळासाहेब एवढे मोठे इंजिनियर! नेहमी कॉंट्रॅक्ट्स्, 'प्लॅन्स्,' दगड आणि माती यांच्याशीं संबंध येणारा इसम! पण बाळासाहेब कॉट-वर आडवे झाले कीं धंद्यांतल्या साऱ्या गोष्टी आपोआप दूर पळत आणि गतकालच्या भावमधूर स्मृति हंसत हंसत, हातांत हात घालून पुढं येत!

बाळासाहेबांनीं हातांतलं पुस्तक तसंच छातीवर टाकलं....सिगारेटची राख 'ॲश ट्रे' मध्यें झाडून टाकली; एक जोरदार झुरका मारला आणि मग कांहींतरी निश्चयानं जरा डाव्या कुशीवर वळून हातांतली सिगारेट तशीच 'ॲश ट्रे' मध्यें ठेऊन दिली. हें सारं करतांना बाळा-साहेबांचे ओंठ कुठल्यातरी सुखद स्मृतींनीं हंसूं लागले....! खुशींत येऊन छातीपर्यंत पसरलेली दुलई त्यांनीं गळ्यापर्यंत ओढून घेतली, डावा हात मानेखालीं घातला आणि कसल्यातरी मादक धुंदीत हलकेच डोळे मिटून घेतले......

गतकालच्या स्मृतींनीं एकमेकीला खुणावलं. एक क्षणभर एकदम नाचल्यासारखं केलं...आणि मग प्रत्येकीनं दुसरीचा हात पकडून हलके हलके परागांच्या मऊ मऊ पावलानं पुढं सरकावयास सुरवात केली....

बाळासाहेब त्या वेळीं 'इंजिनियरिंग' कॉलेजमध्यें शेवटच्या वर्षाला होते. .. कॉलेजमधल्या दोस्तांबरोबर नेहमींप्रमाणं 'बोटिंग' साठीं बाळासाहेब संगमावर आले होते.... वातावरणांत एक प्रकारचं मादक आणि धुंद चैतन्य पसरलं होतं! आकाशाच्या मध्यभागीं आलेल्या चंद्राची छाया बरोबर संगमावर पडली होती.... पाण्याचा नेहमीचा रंग अदृश्य होऊन वितळलेल्या चांदीचा पांढरा शुभ्र रंग पाण्यावर पसरला होता.... त्या वितळलेल्या चांदीच्या रसांत चमचम करणारे सोनेरी मासे! बाळासाहेबांचं शिकारी मन जागृत झालं.... "तुम्हीं या फिरून... मी इथंच बसतो......"

"मासे मारीत वाटतं!" इतरांनीं एकदम गिल्ला केला.

"हो... हो... मासे मारीत! तुम्ही व्हा पुढ... मी त्या दुसऱ्या होडींतून येईन." आणि मग कांहींही न बोलतां बाळासाहेब घाटावरच्या पायऱ्यांवर येऊन हलकेच बसले.

घाटाला लागलेली होडी चटकन् दूर झाली.... झपाझप् वल्हीं सुरू झाली आणि जलनौका हेलावूं लागली......

बाळासाहेबांनीं पाण्यांत पाय बुडवले आणि मग हलकेच गळाची दोरी पाण्यांत सोडली.... चम् चम् करणारे सोनेरी मासे गळाभोंवतीं जमा झाले! बाळासाहेबांनी मारे खुषींत गळाला हिसडा दिला आणि दोरी वर घेतली.... दोरी वर घेतां घेतां पाण्यांत निर्माण झालेल्या खळखळाटानं बाळासाहेबांना समजलं कीं, दुसरी होडी परत फिरली असावी! सहज म्हणून त्यांनीं होडीकडे पाहिलं.... झपाझप् वल्हीं

पाण्यावर पडत होतीं. तिकडे दुर्लक्ष करून बाळासाहेबांनीं पुन्हा एकदां गळाला हिसडा दिला आणि दोरी पाण्यांत सोडली अन् मग हलकेंच वर ओढली......

"का हो! लागला वाटतं गळाला मासा?" फिरलेल्या होडींत, बसलेल्या व्यक्तीनं हंसत हंसत प्रश्न विचारला आणि मग होडींत कांहीं-तरी गोड खसखस पिकली.

बाळासाहेबांनीं चमकून होडीकडे पाहिलं! हातीं पकडलेला गळ तसाच अधांतरीं राहिला.... खालच्या पायरीवर टाकलेला पाय तसाच पायरीवर खिळून राहिला आणि दृष्टि स्थिर झाली. "होडींत...होडींत आणि दोन तरुणी!..." बाळासाहेबांनी पुन्हा एकदां दृष्टि विस्फारली आणि मग नजर स्थिर केली. त्यांना कळेना कीं, होडींत प्रमत्त तरुणी कुठून आल्या!...

झपाझप् होडी घाटाला लागली...होडींत त्या दोन तरुणी आणि त्यांच्या शेजारीं....! बाळासाहेबांना वाटूं लागलं कीं, त्या इसमाला आपण कुठं तरी पाहिलं असावं...पण... नेमकं कांहींच आठवेना!

"का हो, येणार का बाळासाहेब!" आतां मात्र बाळासाहेब चांगलेच चमकले. त्यांच्या शेजारीं बसलेल्या माणसानं आपल्याला चक्क हांक मारावी आणि आपण मात्र त्याला ओळखूं नये...

घाईघाईनं बाळासाहेब होडींत चढले. पुन्हा होडी भरली...वल्हीं सुरू झालीं आणि पाण्यावर तरंगणाऱ्या होडींत मादक धुंदींत तरंगणारी सरल मनं हेलावूं लागलीं...!

बाळासाहेबांनीं निरखून त्यांना हांक मारणाऱ्या इसमाकडे पाहिलं आणि कांहींतरी आठवून, म्हटलं, "तुम्ही...तुम्ही मधुकर इनामदार... विल्सनला होता...!" हाताला हात भिडले आणि जणुं कांहीं 'ओळखलं तुम्हांला' हें सांगण्याकरतां डोळ्यांची मजेशीर हालचाल झाली.

" ह्या मिसेस इनामदार...आणि ही माझी मेहुणी...माधुरी मराठे... आणि हे...हे... बाळासाहेब बापट ! आमच्याच कॉलेजला होते मुंबईला...मला दोन वर्षे ज्यूनियर..."

" ह्याही विल्सनलाच असतात वाटत ! "

" कोण मी ! अं हं... झेविअरला आहे सध्यां मी "... मि. आणि मिसेस इनामदार आपोआपच संभाषणांतून बाजूला पडले.

" आणि मग इकडे ? "

" तुमच्यासारखी...मजा मारायला..."

" म्हणजे ! मी कांहीं मुंबईहून नाहीं आलों मुद्दाम इकडे..."

" असं होय ! " बोलतां बोलतां तिनं भुवया उडवल्या आणि डावा डोळा किंचित् बारीक करून जरा हंसल्यासारखं केलं. तिच्या बोलतां बोलतां बारीक होणाऱ्या डोळ्यांकडे पाहून बाळासाहेबांना वाटलं, 'बहुतेक बोलतांना डोळा बारीक करायची संवयच असावी हिला ! '

हंसत हंसत तिनं वल्हं हातांत घेतलं !

बाळासाहेब आश्चर्यानं पाहूं लागले. तिच्याकडे पाहतां पाहतां त्यांना वाटलं, " ही कुणी मत्स्यगंधा तर पाण्यांतून वर आली नाहींना ! बाळासाहेबांकडे तोंड करून वल्हं हातांत पकडून ती मारे ऐटींत बसली होती. तिच्या बसण्याच्या मोहक घाटणीकडे आणि उत्तेजक शरीरसौष्ठवाकडे पाहून बाळासाहेब भारावल्यासारखे झाले...आणि तिनं तलम, विशविशीत आणि झिरझिरीत निळं पातळ सफाईदारपणं लपेटलं होतं...! सभोंवताली पसरलेल्या चंदेरी वातावरणाच्या आणि विशेषतः तिनं पातळाच्या आंत घातलेल्या शुभ्र वस्त्राच्या पार्श्वभूमीवर तिचं निळं पातळ उठून दिसत होतं ! मध्येंच वारा थरारे...भिरभिरे, शुभ्र पाणी हेलकावे आणि तिचं वस्त्र अगदीं घट्टपणें शरिराला चिकटून जाई ! ...भुरभुर-

णाऱ्या केसाना मागं दवडण्याकरता ती मानेची मध्येंच मोहक हालचाल करी आणि पुन्हां सपासप् पाण्यावर वल्हीं मारूं लागे!... वल्हीं मारून दमल्यामुळें तिच्या मांसल आणि पुष्ट उरोजांची मजेशीर हालचाल सुरूं झाली. बाळासाहेबांना वाटलं, " हिनं वक्षःस्थळ इतकं घट्ट बांधून घेतलं असतांनासुद्धां आंत दडलेले उभार उरोज बेबंदपणें बाहेर डोकावण्याची पराकाष्ठा करीत आहेत. "

बाळासाहेबांच्या दृष्टींतला भाव तिनं ओळखला किंवा काय कुणास ठाऊक! तिनं झटकन् वल्हं होडींत फळीवर टेकलं आणि अवखळ वाऱ्यावर उडणारा खोडकर पदर सफाईदारपणं ब्लाउझमध्यें खोंचून दिला...

" दमलांत तुम्ही...ही कामं बायकाचीं नव्हेत! " गोंधळलेली स्थिति लपवण्याकरतां बाळासाहेब पटकन् कांहींतरी बोलून गेले... बाळासाहेबांची कल्पना होती कीं, आपल्या त्या बोलण्यावर ती " इश्श्! " म्हणून मानेची मोहक हालचाल करील...पण तिनं फक्त " अस्सं!—" म्हणून ओंठांना अशी कांहीं मुरड घातली कीं, बाळासाहेब पाहतच राहिले....

" खरंच दमलांत तुम्ही..."

" म्हणजे! माझ्याविषयीं तुम्हांलाच जास्त कळंतय् असं दिसतं! पाहूं या तर खरं...घ्या ते वल्हं आणि करा सुरवात माझ्याबरोबर......"

" पण तुम्ही खूपच दमलां आहां..."

" पुन्हा तेच...हं...मारा वल्हं......" आणि मग सप्दिशीं तिनं पाण्यावर वल्हं मारलं. बाळासाहेबांना वाटलं, " विचित्र दिसते ही मुलगी! पुरुषांची बरोबरी करण्यांत हिला मजा वाटते तर!..."

......विचारांच्या गुंगीत बाळासाहेब उजव्या कुशीवर वळले. स्मृतींनीं एकमेकींचे हात सोडून दिले, भराभर टाळ्या वाजवल्या आणि हंसत खिदळत त्या पसार झाल्या...

गोड गुंगींतून भानावर येऊन बाळासाहेब स्वतःशींच हंसेल! "इश्श! हंसतां काय वेड्यासारखं..." माधुरीचीं लांबसडक बोटं बाळासाहेबांच्या केंसातून फिरूं लागलीं. त्यांनीं झटकन् माधुरीचे हात पकडले आणि तिच्या तोंडाजवळ ओंठ नेऊन ते कांहींतरी पुटपुटले, "माझ्या हंसण्याचं कारण तूंच... तूंच बरं माधुरी..." आणि मग पुन्हां खो खो करून हंसूं लागले.

"तुमच्या हंसण्याचं कारण मी! इश्श! कांहींतरीच... झालं तरी काय असं!" बोलतां बोलतां नेहमींच्या लकबींत डावा डोळा बारीक करून ती बाळासाहेबांकडे पाहूं लागली.

"तूंच बरं माझ्या हंसण्याचं कारण..." हंसत हंसत बाळासाहेबांनीं तिच्या हनुवटीवर बोट टेकलं.

"इश्श! पण मी हंसायला असं केलं तरी काय?"

"तसं कांहीं नाहीं ग! लग्नापूर्वीं आपली संगमावर झालेली ओळख... त्या ओळखीचं दाट मैत्रींत झालेलं रूपांतर आणि मग तूं माझ्या पाठीमागं लागली होतीस... आठवतं ना!"

"अस्सं! खासा न्याय... मी तुमच्या पाठीमागं लागले होंते वाटतं!"

"अरेच्या! म्हणजे मी लागलों होतों वाटतं!"

"आतां काय झालं बोलायला!! उगाच वाटतं पुण्याहून मुंबईला येत होतेत!..."

"वा ग वा! तुला काय वाटतं, तुझ्यासाठीं येत होतों होय मुंबईला... साधा भोळा मी! म्हटलं मामा आहे माझा मुंबईला..."

"तुमचा मामा 'झेवियर कॉलेज' मधेंच राहत होता नाहीं?" आणि मग माधुरी मोठमोठ्यानं हंसूं लागली.

"येत असेन कॉलेजमधें मी... त्याचं काय एवढं? पण समोर 'मेट्रोला' जायचं मल वाटतं......"

" म्हटलं असेल बाई 'पिक्चरला' जायचं मी! त्याचं काय आतां ?... पण कांहीं झालं तरी तुम्हीच लागले होतेत माझ्या पांठीमागं हात धुऊन..."

" हो, जसं कांहीं मीच मागणी घालायला आलों होतो नाहीं तुला!"

" समजतं म्हटलं आम्हांला...आम्ही आलो तुमच्या घरीं सांगून, म्हणून कांहीं..." वाक्य अर्ध्यावरच सोडून तिनं बाळासाहेबांकडे पाहिलं...

" म्हणून कांहीं तूं माझ्या मागं होतीस असं..." बाळासाहेबांनीं मुद्दामच पुन्हा मुद्द्याला हात घातला...

" उगाचच नको ही तुमची टुरटुर! तुमचं आपलं रोजचंच चालतं हें... मला वाटतं आपला वाद हा कांहीं असा तसा संपणार नाहीं; पैज मारूं आपण...

" पैज!"

" हो हो पैज!"

" अग पण..."

" अगदीं बोलूं नका... पाहूं या आतां! आपल्यापैकीं कोण मोठं तें ह्या पैजेचा निकालच ठरवील... आहे कबूल? बोला!" आवेशांत येऊन डाव्या हाताच्या तळव्यावर उजव्या हाताची मूठ माधुरीनं जोरदार रीतीनं आपटली आणि पैजेला आव्हान दिलं.

" अग पण पैज तरी काय?"

" हं त्यांत काय मोठं! आपण एखादी उत्तम कलाकृति निर्माण करायची... ज्याची कलाकृति उत्तम त्यानं पैज जिंकली... पाहूं या, आतां कोण श्रेष्ठ ठरतं तें!"

" पैजेला मुदत..."

" मुदत कशाला! लवकरच पुरी झाली तर फारच उत्तम..." पुन्हा एकदां तिनं भुवया मुरडल्या, धनुष्याच्या प्रत्यंचेप्रमाणं त्या खूप

ताणल्या आणि मग नेहमींप्रमाणं डोळा बारीक करून ती बाळासाहेबांकडे पाहूं लागली. “ बोला, आहे कबूल ?...”

“ हो...... आहे कबूल......” बाळासाहेबांनींही आत्मविश्वासानं पैजेचं आव्हान स्वीकारलं—

बाळासाहेबांचा कल्पक मेंदू निरनिराळ्या तऱ्हेनं विचार करूं लागला... “ श्रेष्ठ कलाकृति निर्माण करायची ! जगांतल्या चांगल्या गोष्टी. . .तिलोत्तमा...! पण ती विश्वकर्म्याची कलाकृति ! हां बरोबर... बस्स ! मुमताजचा ताजमहाल...बस्स ! ” स्वतःच्या कल्पनेवर खुष होऊन बाळासाहेबांनीं प्रमुख ‘ इंजिनियर ’ लोकांना एकत्र जमवलं आणि बंगल्याचा प्लॅन त्यांच्यापुढं मांडला...

...बाळासाहेबांची श्रेष्ठ कलाकृति स्वरूप आणि आकार धारण करूं लागली.

मधेंच बाळासाहेब माधुरीच्या हालचालीचा कानोसा घेत...! माधुरीला स्वस्थ पाहून त्यांना एकप्रकारचं समाधान वाटे पण त्याच वेळीं मनाला शंका वाटून जाई कीं, ही अजून स्वस्थ कशी ! पण बाळासाहेब, “ स्त्रीची जात अशीच विसराळू ! ” असंच कांहींतरी मनाचं समाधान करून घेत आणि बंगल्याच्या कामाला लागत....

असंच एकदां माधुरीच्या हालचालीचा कानोसा घेतां घेतां बाळासाहेब खो खो करून हंसूं लागले.

“ इश्श ! हंसायला काय झालं ? ” माधुरीनं दचकून बाळासाहेबांकडे पाहिलं.

“ कांहीं नाहीं...कांहीं नाहीं...इतका पैसा आहे आपल्याजवळ ? ”

“ बरं मग ? ”

“ मग कांहीं नाहीं, तूं आपली भिकारी ती भिकारीच...काय ग, आवळे-चिंचा कसल्या खातेस दिवसभर ! ”

माधुरीनं हातांतले आवळे झटकन् मुठींत लपवले अन् चंबूसारखं तोंड करून म्हटलं, "असूं दे आम्ही भिकारी! पैज विसरलां वाटतं!"

"तेंच विचारतोय् तुला मी...आठवण आहेना! नाहींतर आवळे-चिंचा खातां खातां विसरून जाशील सारं..."

"अस्सं! मला आहे चांगली आठवण..तुम्हीच पहा."

"तें पहातोंच आहे ग!"

आणि मग दुप्पट उत्साहानं बाळासाहेब कामाला लागत.

प्रकाशांत अंधार आणि अंधारांत प्रकाश मिसळून कित्येक दिवस आणि रात्री एकमेकाला लपेटून पुढं निघून गेल्या....

बाळासाहेबांची कलाकृति पूर्ण झाली.

एक दिवस हंसत हंसत बाळासाहेबांनीं माधुरीला म्हटलं, "लक्षांत आहे ना बाईसाहेब!"

"हो हो! लक्षांत नसायला काय झालं? बाकी कांहींही म्हणा, भलतंच वेड लागलेलं दिसतं तुम्हांला. घरांत जरासुद्धा लक्ष..."

"काय म्हणालीस, वेड! ते कसलं बुवा!"

"तें तुमचं तुम्हाला ठाऊक...बरं पण पैजेचं काय झालं?"

"व्हायचं काय! माझी केव्हांही तयारी आहे..."

"अय्या! आज सुद्धां?"

"हो हो, आजसुद्धां! चल... तूं कपडे कर तोंपर्यंत मोटार काढतों मी बाहेर... पाहूं या आतां कोण हरतं तें!"

"म्हणजे! बाहेर जायचं आहे वाटतं?"

"हो! चल आटप..."

बाळसाहेबांनीं मोटारींत बसून हॉर्न दाबला...

घाईघाईनं माधुरी जिना उतरूं लागली. अस्मानी रंगाचं पातळ,

त्यावर खुलणारा ब्लाऊझ, आकर्षक रीतीनं किंचित् फुगे काढून डौलदार रीतीनं उभारलेले केंस आणि पाठीमागं सोडलेला तितकाच मनोवेधक शेंपटा आणि ह्या शेंपट्यावर माळलेली अबोलीची लांब वेणी......बाळासाहेब पाहतच राहिले पण त्या क्षणींही ‘ आपण आज हिची फजिती करणार ’ ह्याच सुखद विचारांनीं त्यांनीं पुन्हा ‘ हॉर्न ’ दाबला.

माधुरी गाडीजवळ येऊन उभी राहिली.

“ अय्या ! ”

“ काय झालं ? ”

“ मोटारचं मॉडेल बदललं वाटतं ? ”

“ हो. . .या बाईसाहेब ! ” बोलत बोलत बाळासाहेबांनीं तिला मोटारींत घेतलं—“ ही पाहिलीस...ही आपली नवी मोटार...‘ एअर कन्डिशन्ड...!’ हा ‘ रेडियो ’ ...बघ आहे कीं नाहीं उत्कृष्ट कलाकृति ! ”

“ अय्या ! म्हणे उत्कृष्ट कलाकृती ! जसं कांहीं तुम्हींच शोधून काढलंत हे मॉडेल नाहीं ? ” तिनं मिष्किलपणें भुवयांची आणि मग ओठांची हालचाल केली. बाळासाहेब पुन्हा एकदा हंसले. हंसतां हंसतां त्यांच्या मनांत आलं, “ थक्कच झाली पाहिजे ही. बंगला पाहून... ”

“ कुठं जायचं ! ”

“ कुठं नाहीं संगमावर. . .”

“ अय्या ! संगमावर. . .तें कशाला बाई ? ”

“ श्रेष्ठ कलाकृति पहायची आहेना तुला. . .संगमावर आपली पहिली ओळख झाली आणि मग तेव्हांपासून तूं माझ्यामागं लागलीस ! आठवतं का ग तुला ? ” तिनं मानेला झटका दिला आणि कांहींतरी बोलण्याकरितां तोंड उघडलं. . .पण तेवढ्यांत बाळासाहेबांनीं ब्रेकस् दाबले आणि गाडी उभी केली. . .

“ उतरावं बाईसाहेब.

" इश्श ! इतकं कांहीं नको करायला...ठाऊक आहे तुम्ही आज आम्हांला दिपवणार ते ! "

" कसचं... ! कसचं ! ! हं...चला बाईसाहेब "

माधुरीला घेऊन बाळासाहेब ऐलतीरावरून पैलतीरावर आले...तिला कळेना कीं, संगमाच्या पलीकडे हे आपल्याला दाखवणार तरी काय !

" ते पाहिलंस पलीकडं कमळाचं तळं ! "

" खरंच कीं...वाटतं इथंच बसून रहावं...तुम्हांला नाहीं वाटत असं ?"

" म्हणून तर इथं बांधला बंगला..."

" बंगला ? " तिनं एकदम आश्चर्यानं बाळासाहेबांकडे पाहिलं. "मला तर नाहीं बाई दिसत इथं कुठं बंगला..."

बाळासाहेबांकडे खो खो करून हंसूं लागले...

" इश्श ! हंसायला काय झालं ? "

बोलत बोलत दोघं तळ्याजवळ आलीं. " किती छान कमळं फुललीं आहेत नाहीं तळ्यांत ! " हंसत हंसत तिनं डोळे मिचकावले.

" अग पण बंगला पाहिलास कीं नाहीं ! "

ती आश्चर्यानं बाळासाहेबांकडे पाहूं लागली; " असं हो काय ? इथं कुठाय् बंगला ? " बाळासाहेब परत एकदां हंसूं लागले...

" नुसतं हंसतां आहांत झालं ! पैज विसरलां वाटतं ? "

" तुला काय वाटतं ? " हंसत हंसत बाळासाहेबांनीं तळ्याकांठच्या एका विशिष्ट खुणेवर पाय दिला. " बघ, तीं कमळं एकमेकांकडे पळूं लागलीं. "

" अगबाई खरंच कीं ! माणसासारखीं कमळं चालूं लागलीं...आणि हे काय— ! "

" कांहीं नाहीं, आतां पहातच रहा तूं "

" अगबाई ! ' सुस्वागतम् ', कमळांनींच हीं अक्षरं तयार केलीं ! अहो असं काय करतां ! सांगा तरी...काय, चाललंय काय हें ? "

" हो हो ! सारं कांहीं सांगतों...बंगला पहायचा आहे ना तुला...?"

तिचा हात हातांत घेऊन बाळासाहेबांनीं पुन्हां एकदां तळ्याकांटच्या खुणेवर पाय दाबला...पाण्यावरचीं कमळं नाहींशीं झालीं...पाणी कमी कमी होऊं लागलं...आणि पाण्यांतून एखाद्या गिर्रेबाज कबुतरालाहि लाज वाटावी अशा रीतीनं कांहींतरी वरतीं येऊं लागलं...

" अगबाई, बंगला !! किती छोटा पण किती टुमदार...! आणि ताजमहालासारखा अगदीं पांढराशुभ्र !"

" कां ग ! अशी बावरलीस का ?"

" बावरलें ? छेः छेः !–पण किती सुंदर नाहीं ? पण पाण्यांतून कसा आला वर ? अल्लाउद्दिनाचा एखादा दिवा तर नाहींना तुमच्याजवळ ?" तिनं कौतुकानं बाळासाहेबांकडे पाहिलं, " कां हो खरंच ! ही काय जादू ?"

" जादू तर खरीच ! पण कशी आहे ?... म्हटलं विसाव्या शतकांत आहोंत आज आपण." बाळासाहेबांनीं मुद्दामच शेवटच्या वाक्यावर जोर दिला.

" चल बंगल्यांत जाऊं आतां आपण...'

" बंगल्यांत जायचं ! आणि तें ह्या ? ह्या पाण्यांतून कसं बाई ?" तिचा प्रश्न पुरा व्हायच्या आंतच कांहींतरी सळसळ झाली आणि पाण्यावरती एक छोटासा झुलता पूल तयार झाला.

" हं...चल आतां."

बंगल्याच्या फाटकासमोर उभं राहून बाळासाहेबांनीं कसली तरी कळ दाबली. झटकन् फाटक बाजूला खेंचलं गेलं ! " बघतेस काय अशी वेंधळ्यासारखी ! चल आंत..."

तिनं फाटकांतूनच बंगल्याच्या शिरोभागीं पाहिलंः 'जलतरंग' शिरोभागीं कोरलेलीं अक्षरं निरनिराळ्या आकर्षक रंगांत चमचम करूं लागलीं. अक्षरावरची नजर काढून तिनं ती बंगल्याच्या आजूबाजूला

फिरवली. लहानमोठीं कारंजीं थुई थुई करून निरनिराळ्या रंगांचं पाणी आजूबाजूला इतस्ततः फेंकीत होतीं..." खरंच किती छान ! तुम्ही केलं हें सारं ? " तिनं अभिमानानं बाळासाहेबांकडे पाहिलं.

" अग पण आंत तर चल."

तिनं दोन पावलं पुढं टाकलीं. बंगल्याचं फाटक आपोआप बंद झालं. आंत आल्याबरोबर तिच्या लक्षांत आलं कीं बंगल्याभोंवतालचं सारं आवार ' एअर कन्डिशन्ड ' आहे ! तिनं भांबावून पुढं चालायला सुरुवात केली. बाळासाहेबांनीं सहज म्हणून एक ' बटन् ' दाबलं आणि मग जाई, जुई, केवडा, मदनबाण, निशिगंध, हिरवा चांफा साऱ्या उन्मादक फुलांच्या वासाची एक धुंद झुळूक तिच्या अंगावरून निघून गेली. " इथं कुठं फुलं दिसत नाहींत, आणि मग सगळ्या फुलांचा वास आला तरी कुठून ? " तिच्या प्रश्नाकडे लक्षच नाहीं असं दाखवून बाळासाहेबांनीं मारे ऐटींत घराच्या नक्षीदार दरवाजावर टिक् टिक् केलं. दरवाजा आपोआप वर खेंचला गेला. " हं...चल आंत माडीवर जाऊं—"

माडीवर जाणाऱ्या जिन्याकडे ती वळली ! जिन्यावर ती पहिलं पाऊल टाकणार तोंच जिना एकदम नाहींसा झाला. " अगबाई ! स्वप्नांत तर नाहींना मी ? आतां इथं जिना होता आणि पाय टाकणार तोंच..."

बाळासाहेब अगदीं दिलखुलास हंसूं लागले. जवळ जवळ आपण जिंकलं ह्याच आनंदांत ते गर्क झाले होते. " हंसतां काय ! सांगाना... जिना कुठं गेला ? "

" वेडी कुठची !...जिना कशाला हवा माडीवर जायला !...बोल, माडीवर कुठं जायचं !...शय्यागृहांत कीं दिवाणखान्यांत ! "

" मी काय सांगणार !...मी कांहींतरी बोलेन आणि मूर्ख ठरेन... हें सारंच विचित्र चाललं आहे तुमचं !..." ती पुरती गोंधळून गेली.

" हं...ये...अशी जवळ उभी रहा...शय्यागृहांत जाऊं आपण !" बोलत बोलत शेजारच्या भिंतीवर बाळासाहेबांनीं हात फिरवला आणि काय होत आहे हें कळायच्या आंतच तीं दोघं शय्यागृहांत येऊन दाखल झालीं.

" हें पाहिलंस ! हें शय्यागृह..."

अधीऱ्या नजरेनं ती सभोवार पाहूं लागली. आरशांच्या भिंती आणि आरशांचीच जमीन ! खोलीच्या मध्यभागीं ठेवलेला उत्तम मंचक ! आणि मंचकावर न दिसणाऱ्या पण बसल्यावर कळणाऱ्या स्प्रिंगच्या मऊ मऊ गाद्या ! तिनं सुखावून बाळासाहेबांना म्हटलं, " खरंच किती छान आहे सारं ! " बोलतां बोलतां तिनं स्प्रिंगच्या मऊ मऊ उशा हातांत घेऊन उगाच त्या छातीशीं धरल्या. आणि लाडिकपणं त्यावर आपली मान टेंकली.

" बोल - कसं काय वाटतं ! आतां तरी हरलीस कीं नाहीं ? " बाळासाहेबांनीं अधीऱ्या नजरेनं तिच्याकडे पाहिलं. ती पुरती भांबावली होती. " अं ..काय म्हणालांत ? "

"...कांहीं नाहीं...आपली पैज लागली होती; आठवतं ना ? "

स्वतःशीं कांहीं तरी विचार करून, बाळासाहेबांकडे पाहून ती गालांतल्या गालांत हंसूं लागली. हंसतां हंसतां तिचे डोळे, गाल आणि ओंठ सारेच अवयव हंसूं लागले. बाळासाहेबांना वाटलं, " हिच्या डोळ्यांत चांदणं तर नाहींना फुललं...! " बाळासाहेबांकडे पहात पहात तिनं छाती घुसळली आणि जगांतल्या साऱ्या मादक भावना आपल्या डोळ्यांत सांठवून नेहमींच्या लकबीनं डावा डोळा किंचित् बारीक करून ती कॉटवर आडवी झाली..."वाटतं कीं सारं विसरून या मऊ मऊ गादीवर असंच झोंपून रहावं..."

" असा फसणार नाहीं बरं मी...वा ग वा ! तुला काय वाटलं तुझ्या अशा नखरेल रंगादंगानं मी पैज विसरेन होय ? चल ऊठ ." जरा

थांबून बाळासाहेबांनीं विचारलं, " बोल हरलीस कीं नाहीं ! कां पहाय-च्चंय आतां दुसरं कांहीं ? "

" पाहूं या तर खरं तुम्ही काय काय केलंय तें ! चला, स्नानगृह पाहूं " बाळासाहेबांनीं पुन्हां एकदां कळ दाबली, आणि ती दोघं स्नानगृहांत येऊन दाखल झालीं.

" पाहिलंस स्नानगृह ? "

तिनं आजूबाजूला पाहिलं...प्रत्येक ठिकाणीं पाण्याचं छोटसं कुंड आणि कुंडांत पडणारं पाणी. कुठं गवळणीच्या घटांतून, कुठं कृष्णाच्या मुरलींतून, कुठं शंकराच्या जटेंतून तर कुठं हत्तीच्या सोंडेंतून !—आणि पाण्याचा रंगहि निराळा...एका कुंडांत गंगेचं पांढरं शुभ्र; दुसऱ्यांत कृष्णेचं काळंभोर तर तिसऱ्यांत यमुनेचं निळं काळं...आणि शिवाय प्रत्येक कुंडाच्या वर चमचम करणारे कसले तरी पाऱ्यासारखे रुपेरी आकडे ! " हे काय ! रुपेरी आंकडे ? कशाला ? " तिचा प्रश्न पुरा व्हायच्या आंतच बाळासाहेबांनीं एक ' बटन् ' दाबलं. त्याबरोबरच प्रत्येक कुंडाच्या वर पाण्याचं उष्णतामान दाखवणारे विशिष्ट आंकडे चमकूं लागले...

" खरंच बाई, धन्य आहे. "

" अग थांब तर खरी...स्नानाचं ' टब् ' तर पहा..."

ती आजूबाजूला पाहूं लागली. बाळासाहेबांनीं दोन चार ' बटनं ' दाबलीं. त्याबरोबर कसली तरी घडी उलगडली गेली आणि एका कोपऱ्यांत ' टब् ' निर्माण झालं; लगेच ' टब् ' मधें आपोआप पाणी पडूं लागलं.

" अय्या ! "

" बोल आतां हरलीस कीं नाहीं ! आहे कीं नाहीं श्रेष्ठ कलाकृति, का पहायचंय् आतां कांहीं..."

तिनं " अं...हं " म्हणून मान हालवली.

"—का स्वयंपाकघर पहायय्चं अजून ? बायका तुम्ही ! किती शिकल्यात तरी...चल पहाय्चं असेल तर...!"

" छेः बाई ! नको...आपण आपलं शय्यागृहांतच जाऊं..."

" अग आपलंच आहे तें ! इतकी कशाला घाई ?" बाळासाहेब सहज म्हणून बोलून गेले, पण ती एकदम लाजली. बाळासाहेबांनीं कळ दाबली आणि तीं दोघं शय्यागृहांत परत आलीं...

" बोल आतां तरी हरलीस कीं नाहीं ?...पाहिलीस की नाहीं श्रेष्ठ कलाकृति...? का पहायचंय् अजून कांहीं ? "

तिनं उत्तर न देतां उशींत तोंड लपवलं. " कां ग, बोल ना...आतां कशाला उगाच अहंकार! कबूल कर आतां हरलीस म्हणून ! "

" तुम्हांला एक विचारायचं आहे...विचारूं ?—"

" अरेच्या ! विचार ना...एवढं लाजायला कशाला हवं !..."

" तुम्ही एवढं छान घर बांधलंत ! सारं सारं दाखवलंत पण..."

" अग पण बोल ना ! लाजतेस कशाला ? माझ्याजवळ लाजायला काय झालं ! "

" नाहीं...तसं कांहीं नाहीं...पण बाळंतिणीची खोली नाहीं कुठं दाखवलीत ! " तिनं चटकन् उशींत तोंड दडवलं...

" अं... ! अं... ! ! काय म्हणालीस ? बाळतिणीची खोली ? " भिंतीचे आरसे, भिंतीवरचीं उत्तम चित्रें आणि सारं शय्यागृह बाळासाहेबाभोंवतीं गरगर फिरूं लागलं. " अरेच्या ! लक्षांतच नाहीं आलं माझ्या..."

ती खो खो करून हंसूं लागली, " पहा, एवढं सारं तयार केलंत पण साधी आणि आवश्यक गोष्ट विसरलांत ! " तिनं पुन्हां एकदां आपलं तोंड उशींत लपवलं...

" समजलं...समजलं आतां ! तरीच तूं आवळे आणि चिंचा खात होतीस ! कसं नाहीं आलं माझ्या लक्षांत...तूंच आतां श्रेष्ठ कलाकृति निर्माण करणार..." बाळासाहेबांनीं एकदम, ताज्या आणि पक्व सफरचंदासारख्या दिसणाऱ्या तिच्या गालाचा गालगुच्चा घेतला.

" तुम्ही पुरुष बुद्धिविलासांत कदाचित् आम्हांला मागं टाकाल पण आम्ही स्त्रिया..." ती कांहींतरी बोलत होती पण तिकडे दुर्लक्ष करून बाळासाहेब तिला सांगत होते, " खरंच ! मीं एवढं घर बांधलं, पण निर्जीव. तूंच आतां त्या निर्जीव घरांत चैतन्य निर्माण करणार..." आणि मग तिला जवळ घेऊन ते विचारूं लागले. " पण काय ग, सांग ना..."

" चला, मला नाहीं माहीत." त्यांना कृतक कोपानं दूर लोटीत ती म्हणाली.

———

## ६ : आधार

कधीं कधीं मन अकारण उदास होतें. नाना तऱ्हेचे नाना प्रश्न उदासीनतेच्या पोकळींत नाचूं लागतात. कांहीं जीवनाविषयीं, जीवनांतल्या गूढ गोष्टींविषयीं, तर कांहीं नेहमींच्या व्यवहारांतले, मामुली स्वरूपाचे. गंमत अशी कीं ह्या प्रश्नांवर जों जों विचार करावा तों तों मन त्यांत जास्तच गुरफटत जातें. प्रश्नांतून प्रश्न निर्माण होतात आणि सारे प्रश्न फेर धरून भोंवतालीं नाचूं लागतात. ह्या प्रश्नांच्या आवर्तमय सृष्टींत मी हलके हलके ओढला जातों, आणि मग मूळ प्रश्न आपोआपच बाजूला पडतो.

गेले कित्येक दिवस माझ्या मनांत कांहीं प्रश्न रेंगाळत होते. वाटे कीं आम्ही माणसें संसार करून कां राहतों? बायकामुलांची जबाबदारी अंगावर कां घेतों? जबाबदारीचें जीवन जगण्यांत आम्हां लोकांना काय मौज वाटते? हें जें सारें होतें तें सारें, प्रथम वैषयिक भावनेच्या औत्सुक्यानें आणि नंतर अतिरेकानें, कीं अन्य कांहीं कारणासाठीं? एक चुकतो म्हणून दुसरा चुकतो आणि मग परंपरा निर्माण होते, कीं जें घडतें तेंच मुळीं अटळ आणि क्रमप्राप्त आहे? वैषयिक भावनेच्या उसळीवरचा फेंस विरल्यानंतर संसारांत प्रत्यहीं नजरेस पडणारीं भांडणें आणि तंटेबखेडे पाहिले कीं वाटतें, अरे, हें जर सारें असें फसवें आणि वेगडी आहे तर मग हा सारा सोस, ही सारी असोशी कशाकरितां?

ह्या आणि अशा इतर कित्येक प्रश्नांनीं मी पावलोपावलीं गोंधळतों; संभ्रम निर्माण होतो. पण आतां अनुभवांतीं असें आढळून आलें आहे

कीं जीवनाच्या संघर्षांतून निर्माण झालेल्या प्रश्नांचीं उत्तरें जीवनाच्या ओढाताणींतच कुठेंतरी सांपडतात. अवचितपणें.

माझ्या मनांत रेंगाळणाऱ्या प्रश्नांबाबतहि कांहींसें असेंच झालें. कल्पनाहि नव्हती कीं जीवनाच्या आंसाभोंवतीं फिरणाऱ्या प्रश्नांचीं उत्तरें एखाद्या साध्यासुध्या प्रसंगांतून सहजगत्या निदर्शनास येतील !

ज्या एका विशिष्ट प्रसंगांतून ह्या साऱ्या प्रश्नांची उकल झाली तो प्रसंग तसा कांहीं विशेष आहे किंवा विशेष जागीं घडलेला आहे असेंहि नव्हे.

कांहीं कामासाठीं पुण्याहून लोणावळ्यास जात होतों. सकाळच्या वेळीं पुण्याहून सुटणाऱ्या लोकलगाड्या नेहमींच माणसांनीं भरलेल्या असतात. सर्व तऱ्हेचीं आणि सर्व दर्जाचीं माणसें. ह्या गाड्या स्टेशनास्टेशनावरून माणसांना उतरून टाकतात आणि पुढें निघून जातात.

बसल्या जागेवरून, सहज म्हणून आजूबाजूला पाहिलें. सर्व बाजूला माणसें. कांहीं उभीं, कांहीं बसलेलीं. विचारांनीं भारावलेलीं, मनानें पिचलेलीं आणि शरीरानें खंगलेलीं. कसल्यातरी अनिवार ओढीनें पळणारीं आणि कामाच्या भारानें लवलेलीं ! हें सारें पाहून पुन्हां पुन्हां वाटूं लागलें कीं ह्या साऱ्याचा अर्थ काय ! ही सारी काळजी, ही सारी धडपड कुणासाठीं ?

विचार करतां करतां शून्यपणें आजूबाजूला फिरणारी नजर, शेजारच्या माणसावर आणि त्याला बिलगून बसलेल्या स्त्रीवर स्थिरावली. माझ्या नजरेंतले बदलते भाव त्या स्त्रीला उमगले असावे. माझ्याकडे एकदां तिरस्कारानें पाहून ती दुसरीकडे पाहूं लागली. नजरेंतला भाव असा कीं जणूं कांहीं ती माझ्या शेजाऱ्याला चिकटून बसली होती, आणि त्या तशा स्थितींत मी तिला पाहिलें होतें हा माझाच गुन्हा !

साहजिकच माझें तिच्याविषयीं कुतूहल जागृत झालें.

दिसायला ती अगदींच सामान्य होती. रंगानें काळी कुळकुळीत, पिच-पिच्या डोळ्यांची आणि निबर चेहऱ्याची ! कुणाचेंतरी फाटकें जुनेर अंगाभोंवतीं कसें तरी लपटलेलें. एकंदर सुरत अशी कीं कुणालाहि घृणा वाटावी आणि शिसारी यावी. ती बाई होती आणि म्हणूनच तिला बाई म्हणावयाचें एवढें सांगितलें म्हणजे पुरे.

माझ्यामुळें त्या दोघांना अवघडल्यासारखें होऊन संकोच वाटूं नये म्हणून मी माझें अवधान दुसरीकडे आहे असें भासवीत होतों, हें खरें असलें तरी शब्दांचा कानोसा घेण्याकरितां कान मात्र टवकारले होते.

शेजारीं कांहींतरी चाळवाचाळव आणि हलके हलके बोलणें सुरूं झालें. पण सारेंच अस्पष्ट आणि घोगऱ्या आवाजांत ! कान टवकारलेले असून-सुद्धां न समजणारें.

एवढ्यांत शिवाजीनगर आलें. डब्यांतलीं कांहीं माणसें बाहेर फेकलीं गेलीं आणि बाहेरचीं कांहीं आंत कोंबलीं गेलीं. माणसें बदललीं तरी माणसांचे नमुने तेच होते. तेच ते उदास, रडवे, सुतकी आणि चिंता-ग्रस्त चेहरे ! हीं माणसें, ह्या माणसांचे कंटाळवाणे चेहरे आणि दैना पाहून पुन्हां पुन्हां वाटूं लागलें......

पण एवढ्यांत कांहींतरी कुजबूज सुरूं झाली. शेजारचा बुवा हलक्या आवाजांत बाईबरोबर बोलूं लागला. 'बरं झालं तूं आज भेटलीस. मलाहि कुणीतरी हवंच हेतं. आतां अगदां राहवत नाहीं. पुढच्या स्टेशनवर आपण उतरूं. हॉटलांत जाऊं, खाऊं, पिऊं आणि मजा करूं..." आणि मग कांहींतरी हालचाल झाली. अस्पष्ट हास्याची देवाण घेवाण झाली. कदाचित् सलगीची खूण पटविण्याकरितां कांहींतरी चोरटी आणि किळस-वाणी लगट झाली असेल !

माझा धीर आतां बराच चेपला होता. मी उघड उघड त्या दोघांकडे पाहूं लागलों.

शेजारचा इसम अंगापिंडानें चांगला मजबूत होता. नाकींडोळीं नीटस नसला तरी तरतरीत होता. तरतरीत असला तरी चेहऱ्यावर विषादाची झांक होती. कांहींतरी अपुरें, कांहींतरी उणें आहे ह्याची जाणीव होत होती.

पांढरपेशा नाहीं तरी पांढरपेशा इसमासारखा दिसणारा हा माझा शेजारी, त्याला बिलगून बसलेली त्याची ती ओंगळ सहचरी आणि त्या दोघांतले ते सलगीचे बोल! हें सारें पाहून आणि ऐकून वाटूं लागलें कीं पुरुषाची ही केवढी अधोगति! ज्या स्त्रीला माझें मन स्त्री म्हणायला सुद्धां तयार नाहीं त्या बाईविषयीं ह्या इसमाला शारीरिक आकर्षण वाटावें आणि त्याचें नागवें प्रदर्शन चारचौघांत व्हावें! पुरुषाच्या वृत्ती इतक्या कशा स्त्रैण कीं त्या केव्हांहि आणि कुठेंहि चळाव्या!

वाटूं लागलें कीं ह्याच विकारवशतेच्या उद्दाम आवेगानें, सुखलोलुपतेनें आणि इंद्रियासक्तीनें पुरुषांचा संयम ढळत असावा. हाच क्षणभराचा बेसावध क्षण अनर्थांना जबाबदार असावा. आणि मग अनर्थांची परपरा सुरू झाल्यावर माणसाची केविलवाणी धडपड सुरू होत असावी!

पुन्हा कांहांतरी बोलणं सुरू झाल. मी कान देऊन ऐकूं लागलों.

"तुला वाटलं असेल कीं मी हलक्या जातकुळीचा आहे. पण नाहीं. जातीनं अस्सल मराठा आहे. गेल्या महायुद्धांत फलटणींत होतों. तव्हां रक्तांत मस्ती होती. शरीरांत जोम आणि मनगटांत जोर होता. पुढे मग सरकारन पेन्शन देऊन परत पाठवलं. आतां शरीर थकूं लागलं, पण मन जवानासारखं आहे. तू एकदां माझी हो आणि मग बघ..."

गाडी पळत होती आणि दोघांचं बोलणं रगांत आलं होतं.

मनांत आलें कीं हें काय! कुठल्या तऱ्हेची पाशवी भूक! हें जर असं आहे तर पशूंत आणि आमच्यांत फरक तो काय!

माझ्या शेजाऱ्याच्या वृत्तींतला सैतान आणि सैतानांतलें पौरुष आतां पराकोटीला पोहोंचलें होतें. उफाळलेल्या विकारांना आतां फक्त स्त्री हवी

होती. स्त्रीचा नुसता सांगाडा किंवा नुसता रक्तामांसाचा गोळा असला तरीहि आतां चालणार होतें.

स्टेशन आलें आणि गाडीचा वेग कमी झाला.

त्यानें तिचा हात हातांत घेतला, किंचित् दाबला आणि अजीजीच्या स्वरांत म्हटलें, "मग काय ठरवलेंस! चलणार ना आतां तूं माझ्या-बरोबर!"

तिनें हंसून संमतिदर्शक मान हलवली आणि म्हटलें, "जरूर...जरूर आऊंगी!"

वाटलें कीं मामला पटला. इतका वेळ केलेल्या धडपडीचें सार्थक झालें. स्टेशनमध्यें गाडी उभी राहिली.

माझा शेजारी बाईला घेऊन आतां खालीं उतरणार होता. मी कुतू-हलानें पहात होतों.

प्रथम ती बाई उठली. उठतां उठतां तिनें बाकाखालीं ठेवलेली कुबडी वर उचलून घेतली. मी पहात होतों पण मला कळत नव्हतें. वाटलें कीं ह्या धडधाकट बाईला कुबडी कशाला! हात धरून तिनें माझ्या शेजा-ऱ्याला वर उठवलें.

......आणि क्षणांत माझे भरकटणारे विचार थंड पडले. अस्थिर दृष्टी स्थिर झाली आणि मलाच लाज वाटूं लागली.

गाडीला धक्का बसला आणि गाडी सुरू झाली. मोकाट सुटणाऱ्या विचारांनाहि धक्का बसला. हा धक्का जबर होता. जबर होता. एवढेंच नव्हे तर जिव्हारीं बसला होता.

जें कांहीं पाहिलें आणि पहात होतों तें सारेंच कांहीं अनपेक्षित आणि विचित्र होतें.

त्या साऱ्या गोष्टी, तो माझा पायतुटका लंगडा शेजारी, त्याची ती कुबडी धरण्याची विशिष्ट लकब, ती ओंगळ सहचरी, आधारासाठीं

चाल्हूं असलेली केविलवाणी धडपड आणि त्या साऱ्याचे मी लावलेले क्षुद्र अर्थ!

हें सारें मनांत आलें आणि मग जाणीव झाली कीं ही पाशवी भूक नव्हती. हा विकारवशतेचा उद्दाम आवेग नव्हता कीं सुखलोलुपतेंतून निर्माण झालेली पुरुषाची अधोगति नव्हती!

आधारासाठीं केलेली एक प्रामाणिक आणि केविलवाणी धडपड होती.

आतां ती धडपड आठवली कीं वाटतं...

# ७ : "पण मला सून हवी"

तुमच्या–आमच्या कुटुंबासारखंच एक मध्यम वर्गातलं कुटुंब आहे. म्हटलं तर सुखी आहे. म्हटलं तर दुःखी आहे! कुटुंबांत तशीं कांहीं फार माणसं नाहींत. फक्त तीन! आई, मुलगा आणि मुलाची बायको. अगदीं आटोपशीर. केवड्याच्या कणसासारखा बांधलेला आणि सुटसुटीत संसार! तसं पाहिलं, तर अशा कुटुंबांत संघर्ष निर्माण होऊं नये...... होऊं नये हें खरं! पण होतात तिथं तुम्ही–आम्ही काय करणार? केवड्याचं कणीस झालं म्हणून त्याच्या पाटींत कांटे नाहींत असं थोडंच आहे!

माणसं आहेत तिथं रागलोभ आहेत......आणि जिथं रागलोभ आहेत, तिथं भांडणं आहेत, खटके आहेत अन् कलह आहेत! खूप वाटतं, कीं माणसामाणसांनीं एकत्र येऊन निर्माण केलेले संसार सुखाचे व्हावेत! शब्दांनीं शब्द न वाढवतां भावना ओळखून अंतःकरणानं अंतःकरणाशीं दिलजमाई करावी—!—पण अंतःकरणानं अंतःकरणाशीं समरस व्हायला प्रथम दुसऱ्याचं मन ओळखतां आलं पाहिजे. त्याच्या जागीं कल्पून विचार केला पाहिजे! विचार केला कीं विवेक आपोआप सुचतो असं म्हणतात! पण विचार करायचा कुणी आणि कां, हाच तर प्रश्न आहे. ह्या प्रश्नाचे देव्हारे माजवून सोन्यासारख्या संसाराची आम्ही माती केली आहे, अमृतांत विष कालवलं आहे आणि होत्याचं नव्हतं करून बसलों आहोंत......

ज्या कुटुंबांतल्या माणसांची ही गोष्ट मी तुम्हांला सांगणार आहे, त्यांच्या बाबतींतसुद्धां असंच कांहींसं झालं आहे.

तीन तऱ्हेचीं तीन माणसं एकत्र आलीं आहेत. आला दिवस पुढं ढकलीत आहेत ! पोटाला पुरेसा पैसा घरांत येतो आहे, सढळ हातानं खर्च होतो आहे. . .आणि तरीहि कालचा दिवस आजच्यापेक्षां बरा असं म्हणण्याची पाळी आली आहे. लौकिक दृष्टीनं तसं सुखी कुटुंब आहे... पण शांत दिसणारा ज्वालामुखी पर्वत वरून जरी गोंडस भासत असला, तरी आंत पेटत असतो अशी कल्पना आहे ! आणि त्या कल्पनेच्या सत्यतेची ह्या संसाराकडे पाहिलं कीं चांगलीच प्रतीति येते.

भगवंतरावांचं वयहि तसं कांहीं फार नाहीं. त्यांनीं चुका केल्या तरी थोडा वेळ इतर हंसतील आणि मग विसरुन जातील, एवढंच त्यांचं वय आहे. भगवंरावांची गृहिणी म्हणून शांतानं कुठं नुकता दोन वर्षां-पूर्वींच त्यांच्या घरांत प्रवेश केला आहे. चुकलं माकलं सांवरून घेऊन मायेची पखरण पसरायला ताई नेहमीं तयार आहेत. तसं ताईनीं आयु-ष्यांत सारं उपभोगलं आहे ! कर्तासवरता मुलगा घरांत चार पैसे आणीत आहे. लक्ष्मीसारखी सून घरांत वावरते...पूर्वींपेक्षां फार सुखाचे दिवस ताई अनुभवीत आहेत.

सारं कांहीं ठीक चाललं आहे. फक्त खटके उडतात ते एकाच गोष्टी-साठीं...विचार केला कीं कोण बरोबर आणि कोण चूक हें आजहि, ह्या घटकेलाहि मला सांगतां येत नाहीं. तसं पाहिलं तर दोष कुणाचाच नाहीं ! पण विचार केला की वाटतं दोष सगळ्यांचाच आहे.

आयुष्य ही एक तडजोड आहे ! पण हें ज्यांना उमगेल त्यांना ! ज्यांना उमगत नाहीं, वा उमजून समजून घेण्याची इच्छा नाहीं, त्यांच्या संसारांत वादळं निर्माण होतात, महापूर येतात ! आणि मग महापुरांत कोण, कसं आणि कुठं वाहत जाईल ह्याचा काय नेम ! पण ह्या महापुराला वेळींच विचाराचा अन् विवेकाचा बांध घातला तर !–

—पण किती झालं तरी आपण स्खलनशील माणसं !

भगवंतराव चांगले शिकले सवरलेले आहेत. कॉलेजांत प्रोफेसर आहेत. मानमरातबानं जगांत चार दिवस सुखानं काढावे अशी इच्छा उरीं कवटाळलेली आहे. विष्णूलाहि हेवा वाटावा अशी लक्ष्मी नशिबानं मिळाली आहे. संसाराचं गाडं मजेंत आणि सुखांत चालायला कांहींच हरकत नाहीं. पण संसाराच्या गाड्याला गाडीच्या चाकाप्रमाणं कुरकुर करण्याचीच फार हौस !

भगवंतरावांचे वडील, लखुनाना–एक साधे शाळामास्तर ! चार वर्षांपूर्वी सोनं झालं बिचाऱ्याचं ! शाळामास्तरची आवक असून असून ती किती असणार, पण तरीहि अंतःकरण महत्त्वाकांक्षेनं प्रेरित झालेलं ! " आपण शिकूं शकलों नाहीं तर नाहीं; पण आपल्या पोराला तरी शिकवूं ! " हीच इच्छा आणि आशा ! रक्ताचं पाणी करून नानांनीं पैसे मिळवले, भगवंताला कॉलेजांत पाठवलं आणि अतृप्त इच्छा मूर्त स्वरूपांत आणण्याची धडपड केली......

भगवंताला कॉलेजांत शिकत असलेला पाहून, गांवांतले लोक आश्चर्यानं तोंडांत बोट घालीत अन् एकमेकांना म्हणत, " आम्ही एवढे दोन-दोनशें रुपये मिळवतां तरीहि आम्हांला आमच्या पोरांना कॉलेजांत पाठवतां येत नाहीं आणि लखुनाना मात्र..." त्यावर दुसरा पहिल्याला म्हणे, " अरे, ताई आहेत म्हणून हें सारं चाललं आहे, समजलास !—"

वरकरणीं, ऐकतांना हें कुणाला खोटं वाटलं असतं ! पण ताईचा संसार मी जवळून पाहिला असल्यामुळं मला तरी हें खोटं वाटणार नाहीं.

ताई कष्टाळू होत्या...कामसू होत्या,...होत्या एवढेंच नव्हे तर अजूनहि आहेत–आणि तिथंच सारं खटकतं आहे.

भगवंतासाठीं ताईनीं काळवेळ पाहिली नाहीं. दुपार असो, संध्याकाळ असो किंवा रात्र असो ! गाडीला जुंपलेल्या गुरासारख्या ताई घरांत फिरत होत्या...संसाराचा अवजड गाडा पुढं ओढीत होत्या !

कोंकणांत एका तीर्थाच्या ठिकाणीं नानांनीं संसार केला. भाड्याच्या जागेच्या आसपास मोकळी जागा ती किती असणार! पण जी काय जागा होती, त्या जागेत, एका कोपऱ्यांत ताईनीं सोनचांफा वाढवला... माडाच्या बुंध्यांत आळवाचं खाचर तयार केलं आणि कडेला केळीचीं झाडं लावलीं.

उन्हाळ्याच्या दिवसांत झाडं जगण्यासाठीं दोन दोन मैलांवरचं पाणी आणून ताईनीं झाडांना घातलं आहे...दूरवरून पाणी वाहून आणल्यामुळं पाय दुखत असतानांसुद्धां ताईनीं कधींच कुरकुर केली नाहीं. हाताला पडलेले घट्टे पाहून त्यांना कधींच वाईट वाटलं नाहीं.

आपल्या आवडत्या माणसासाठीं, त्याच्या सुखासाठीं आपण काम करीत आहों ही जाणीव मनांत असली म्हणजे पर्वताएवढे कामाचे ढीग हंसत खेळत बाजूला होतात!—

ताई रिकाम्या अशा कधींच दिसत नसत. रात्रीं दिव्याच्या मिणमिणत्या उजेडांत लोकांचीं दळणं दळतांना ताईंना मीं पाहिलं आहे...ज्या वेळीं दळण नसेल, त्यावेळीं हातांत सुईदोरा! पण एकसारखं काम...आणि तेंही भगवंतासाठीं!—त्याच्या सुखासाठीं—

एखादे वेळेला काम करून दमलेल्या ताईचे हात हातांत घेऊन लखू-नाना म्हणत, "अग, किती काम करतेस तूं! हाताला पाहिलेस कसे घट्टे पडले आहेत!" त्यावर ताई सौम्यपणं हंसत आणि मिस्किलपणं म्हणत, "चला—कांहीं तरीच! पुरे झालं कीं आतां बायकोचं कौतुक!"

ताईचा जन्म काम करण्यासाठींच होता कीं काय कुणाला ठाऊक!

मोसमाकांठीं चांफ्याचीं फुलं विकून ताईनीं साठ साठ रुपये गांठीं बांधले आहेत. सरपणासाठीं ताईनीं कधीं एक पैसाहि खर्च केला नाहीं. माडाच्या झावळ्या जाळून ताईनीं चूल पेटवावी आणि त्यावर स्वयंपाक करावा,..त्यामुळं घरांत धूर होई, ताईच्या नाकाडोळ्यांतून पाणी वाहू

लागे, पण ताईनीं त्याची कधींच पर्वा केली नाहीं ! ज्या वेळीं झावळ्या नसतील, त्या वेळीं सुका पाला पाचोळा ! झावळयांपासून केरसुण्या तयार करण्याचा तर ताईंना मनस्वी नाद ! ताईंच्या हातच्या केरसुण्या दहापांच घरांत तरी हटकून फिरत असायच्या !

एवढं सारं करून जे काय पैसे मिळत, ते ताई नियमितपणं भगवंताला पाठवून देत......त्यामुळं भगवंत कॉलेजांत शिकत होता.

लोकांना हें कळणं शक्य नव्हतं!......आणि म्हणूनच भगवंत मुंबई-सारख्या ठिकाणीं राहून कॉलेजचं शिक्षण कसं घेतो ह्याचं लोकांना आश्चर्य वाटत होतं......

भगवंत बी. ए. च्या वर्गांत असतांनाच लखूनाना कुठल्याशा सांथीला बळी पडले. पोरानं कच खाल्ली ! पण ताईनीं अश्रू आवरले, पोराच्या डोळ्यांतले अश्रू पदरानं पुसले अन् म्हटलं, " तूं रडतोस ! मग मी रे कुणाच्या तोंडाकडे बघूं ? " हरतऱ्हेनं ताईनीं स्वतःच्या मनाची समजूत घातली आणि स्वतःला पुन्हां एकदां कामाला जुंपून घेतलं. दिवसभर काम, काम आणि काम ! ताईंची इच्छा होती, " आतां फक्त दोन वर्षं राहिलीं आहेत. पोरगाहि हुशार आहे...आपण खस्ता खाऊं. पण पुढं तो तरी सुखांत राहील ! आपल्याला सुखांत ठेवील..." मनाशीं निरनिराळे सुखदायक विचार करीत ताई आला दिवस पुढं रेटीत होत्या.

पण माणसाच्या भावनांशीं खेळायची देवाला मोठी वाईट खोड आहे, कोण काय करणार !

भगवंताच्या सुखासाठीं कोकणांतल्या एका खेडयांत ताई रक्ताचं पाणी करीत होत्या ! पण ज्या भगवंतासाठीं ताई हें सारं करीत होत्या, तो त्यांचा दिलासा ताईपासून फार दूर, मुंबईत वावरत होता.

ताईंचं जग कोंकणांत होतं ! निष्पाप, कष्टाळू, श्रमदेवतेचं !

भगवंताचं जग मुंबईत होतं ! परुषं, दांभिक, आलस्यदेवतेचं !

बुलंद मोत्यांचं भरघोस पीक हातीं येईल म्हणून मनीषा बाळगावी, पण मूठ उघडल्यावर हातांत मोतीं नसून कांचेच्या फुटक्या कवड्या आहेत हें कळून यावं ! तसंच कांहींसं ताईच्या बाबतींत झालं !

सभोंवतालच्या वातावरणाचा माणसाच्या आयुष्यावर बरावाईट परिणाम होतो असं म्हणतात ! मुंबईच्या वातावरणाची भगवंताच्या मनावर चांगलीच छाप पडली. झकपक पोषाख केलेले लोक, उच्च संस्कृतीच्या पोकळ गप्पा मारणारा विशिष्ट जनसंमर्द...कांचेच्या भांड्याप्रमाणं प्रतिष्ठेचा फसवा बाऊ करणारे भेकड ! सारं फसवं आणि नटवं–!...नटव्या आणि फसव्या गोष्टींनीं माणूस चटकन् मोहित होतो...तसं नसतं तर !

ह्या साऱ्या गोष्टींनीं भगवंत आणि ताई यांच्यांत एक खोल दरी निर्माण झाली. प्रतिष्ठेचा बाऊ करणारा भगवंत दरीच्या एका सुळक्यावर उभा होता; जगांत मिळेल त्यांत समाधान मानायचं, जगण्यासाठीं प्रामाणिक धडपड करायची हें जाणणाऱ्या ताई दरीच्या दुसऱ्या सुळक्यावर उभ्या होत्या आणि ह्या दोन सुळक्यांमध्यें कुणाचंहि चांगलं न पाहवणारा लोकसमुदाय घोंघावत होता !

ह्याचा अर्थ असा नव्हे, कीं मुलगा आईला विसरला किंवा आई मुलाला विसरली ! मुलाचीं म्हणून जीं जीं कर्तव्यं असतात तीं तीं सारीं पार पाडण्याची भगवंत पराकाष्ठा करीत होता. ! ताईबद्दल तर संशयालासुद्धां जागा नव्हती.

दोन माणसं एकमेकांच्या आसऱ्याला राहून, एकमेकाला सुखी ठेवण्यासाठीं धडपड करीत होतीं. पण सारंगीची तात आणि तराफा बाजूबाजूला एकमेकांच्या आसऱ्याला असूनसुद्धां त्यांना जर योग्य प्रमाणांत पीळ भरलेला नसेल, तर बदसूर सूर निर्माण झाल्याशिवाय थोडेच राहणार !

एम्. ए. झाल्याबरोबर ताईच्या म्हणण्याप्रमाणं भगवंतानं रत्नागिरीच्या कॉलेजांत नोकरी धरली. त्याच्या मनांतून मुंबईपुण्याकडच्या कुठच्या

तरी कॉलेजांत रहायचं होतं! पण त्याचे विचार ताईनीं स्पष्ट शब्दांत खोडून काढले...भगवंतनं ताईचं ऐकलं आणि प्रोफेसर म्हणून आपल्या लौकिक जिण्याला सुरुवात केली.

एवढं होईपर्यंत सारं कांहीं ठीक चाललं होतं! पण भगवंताच्या लग्नाच्या वेळीं मायलेकांचा थोडासा खटका उडाला. ताईच्या मनांतून श्रीमंताच्या घरची मुलगी नको होती. ताईनीं स्पष्ट शब्दांत भगवंताला सांगितलं होतं, " बाबा रे—आपण पायांनीं चालणारीं! मोटरींत बसून हिंडणाऱ्या माणसांकडे पाहून कसं चालेल! मला विचारशील तर...'

पण ह्यावर भगवंतानं ताईना बोलूंच दिलं नव्हतं! आयुष्याबद्दल उमेद बाळगणाऱ्या, स्वतंत्र वृत्तीच्या कुठल्याहि तरुणाला ताईचं बोलणं रुचणारं नव्हतं.

आपलं सांगणं मुलाला पटत नाहीं हें पाहिल्याबरोबर ताईनीं समजूतदारपणा दाखवून मिळतं घेतलं...पण कुठं तरी खोलवर ताईच्या अंतःकरणांत सलूं लागलं. त्यांना वाटलं, " मुलगा आतां मोठा झाला. आपण सांगूं त्याप्रमाणं वागायला तो आतां लहान थोडाच आहे! उगाच घरांत आपली अडगळ मात्र .."

ताईच्या समजूतदारपणामुळं एका बड्या घरांतल्या मुलीनं—शांतानं भगवंतरावांच्या आयुष्याचा मक्ता आपल्याकडे घेतला.

आणि इथूनच पुढं संघर्ष निर्माण व्हायला सुरुवात झाली. तसं वाईट कुणी नव्हतं! पण भिन्न प्रकृतींचीं तीन माणसं परिस्थितीनं एके ठिकाणीं बांधलीं गेलीं होतीं...

कुणाचाहि स्वभाव वाईट नव्हता. आपापल्या परीनं ज्याचं त्याचं बरोबर होतं. प्रश्न होता तो फक्त स्वभाववैचित्र्याचा! ह्या स्वभाववैचित्र्यामुळंच भावना दूर राहूं लागल्या आणि क्षुल्लक गोष्टींचा विपर्यास होऊं लागला.

ताई शक्य तों मिळतं घेऊं पाहात होत्या! शांतावहिनी समजूतदारपणं वागायचा प्रामाणिक प्रयत्न करीत होत्या! पण ज्या गोष्टी मूळ रक्तांतच नाहींत, त्या आचरणांत कुठून येणार! ताईंच्या नसानसांत, रक्ताच्या अणुरेणूंत कष्ट करण्याची जाणीव होती, किंबहुना ताईचं रक्तच कष्टाचं होतं! शांतावहिनी लहानपणापासून श्रीमंत घरांत वाढलेल्या! ताटावरून पाटावर आणि पाटावरून ताटावर करण्याची संवय! सुखलोलुप रक्त! कितीहि प्रयत्न केला तरी रक्तांत भिनलेल्या गोष्टी सहजासहजीं थोड्याच दूर करतां येणार...

त्यामुळं लहानसहान गोष्टींवरून घरांत खटके उडूं लागले......

परवांचाच प्रसंग! जेवणंखाणं झालीं—भगवंतराव झोंपायच्या तयारीनं माडीवर निघून गेले. शांतावहिनी स्वयंपाकघरांत झांकपाक करीत होत्या! अशा वेळीं ताईनीं कोंपऱ्यांतलं जातं पुढं ओढलं आणि दळण दळायला सुरुवात केली. ताईची कल्पना होती कीं सून जात्याला हात लावील...निदान चोकशी तरी करील. पण त्या गोष्टी शांतावहिनीच्या रक्तांतच नव्हत्या. घरांत दळणकांडण असं त्यांनीं कधीच केलं नाहीं. ताईनीं दळण दळायला सुरुवात केलली पाहून त्यांनीं म्हटलं, "आतां कशाला हवं दळायला! उद्यां गिरणांत देऊं कीं..." पण त्यावर ताई कांहींच बोलल्या नाहींत...उलट रागानं जोमाजोमांत जातं ओढायला त्यांनीं सुरुवात केली. शांतावहिनींना वाटलं, "ह्यांना एवढ पैसे मिळतात, खर्च करण्याचीहि त्यांची तयारी आहे. असं असतांना असलीं कामं घरींच करण्याचा सासूबाईचा कां अट्टाहास!" कांहीं तरी पुटपुटत शांतावहिनी तांब्याभांडं घेऊन जिना चढूं लागल्या. ताईनीं एकदम जात थांबवलं... मुद्दामच जात्याचा खुटा वरवंट्यानं ठोकला आणि म्हटलं, "इतका वेळ पाहत होतें...पण तुझं कांहीं लक्षण दिसत नाहीं. आम्हीसुद्धां माणसंच आहोंत ना! ज़रा हात लावलास जात्याला तर!"

" पण मी तुम्हांला सांगितलं ना कीं उद्यां दळण गिरणींत देऊं म्हणून—"

" मोठी आलीस मला अक्कल शिकवायला ! तुला यायचं नसलं तर—"

" आलें असतें; पण जातं ओढायला लागलं कीं माझ्या पोटांत दुखूं लागतं, आंतडीं पिळवटून निघतात—"

" अहा रे मेणाची बाहुली ! म्हणे पोट दुखतं...आम्हांला जशीं काय पोटंच नाहींत...जा, चालूं लाग वर...वर तो टोणगा झोंपला आहे खुशाल ! चढवून ठेवलंय् त्यानं तुला—"

हें सारं ऐकून फार तमाशा नको म्हणून भगवंतराव धांवत धांवत खालीं आले. डोळ्यांनीं खूण करून त्यांनीं शांताला जातं ओढायला सुचवलं......आणि सौम्य शद्बांत ताईंची समजूत घालायला सुरुवात केली..." ताई, पूर्वी आपली गोष्ट निराळी होती. सध्यां मला पुरेसे पैसे मिळतात. कशाला करतेस तूं हीं असलीं कामं ? "

" वा रे वा ! बायकोच्या नादीं लागून तूंहि लागलास वाटतं मला अक्कल शिकवायला ! बायल्या झालायस् नुसता——"

" ताई ! " भगवंतराव एकदम ओरडले.

" ओरडा...ओरडा खुशाल ! तुमच्या ताब्यांत आहे ना मी ! " क्षुल्लक गोष्टीचा विपर्यास करून ताई फडाफड स्वतःच्या थोबाडींत मारून घेऊं लागल्या. भगवंतराव समजूत घालण्याची पराकाष्ठा करीत होते. पण, " समजतं मला ! मीच नको तुम्हांला. अडगळ होते आहे माझी..." ताई कांहीं तरीच बोलूं लागल्या.

भगवंतरावांना कळेना कीं आतां काय करावं ! ताईचंहि बरोबर होतं, बायकोचंहि बरोबर होतं ! बोलायचं कुणाला ? इकडे आड आणि तिकडे विहीर......

आला दिवस न बोलतां भगवंतराव पुढें ढकलूं लागले. कारणापुरतं बोलायचं आणि गप्प बसायचं !

ह्यामुळें घरांत तंग वातावरण निर्माण झालं.

भगवंतरावांनीं शांताला एका बाजूला घेतलं, तिची समजूत घातली आणि सांगितलं, " मला साऱ्या गोष्टी कळतात ! तुम्ही दोघी अशा वागतां; माझी स्थिति मात्र मृदंगासारखी झाली आहे. माझ्यासाठीं तरी तूं ताईला विरोध करूं नको...तिच्याशीं जमवून घे... "

भगवंतरावांच्या सांगीप्रमाणं शांतावहिनी ताईच्या कामाशीं समरस व्हायचा प्रयत्न करूं लागल्या......किंचित् खटके कमी झाले.

अजूनहि अबोला चालूच होता. फक्त कामापुरतं बोलायचं, कामापुरतं एकमेकांशेजारीं वावरायचं, हवं–नको त्याची तिऱ्हाइतासारखी चौकशी करायची ! बस्स् ! ह्याच्यापलीकडे कांहीं नाहीं.

एखाद् वेळेला ह्या अबोल्यामुळं ताई कावून जात आणि अद्वातद्वा बोलायला सुरुवात करीत...आणि मग भगवंतरावांच्या साऱ्या कृत्यांचा उद्धार होई. " तुला अजून कांहीं कळत नाहीं. जेवढं मिळवतोस तेवढं खर्च करतोस ! सांग, किती टाकलीस शिल्लक गेल्या महिन्याला ? " ताईचा हा प्रश्न ऐकून भगवंतरावांचं डोकं भणभणूं लागे. त्यांना वाटे, " हा कोण नसता जुलूम ! मी पैसे मिळवतो, खर्च करतो ! ताईला काय करायचंय् ? "

दिवस जात होते, खटके वाढत होते आणि साऱ्या गोष्टी एका निराळ्याच तऱ्हेनं चालूं होत्या !

न बोलतां पूर्वीप्रमाणंच ताईनीं कामाला जुंपून घेतलं. झाडांना पाणी घालणं, त्यांची जोपासना करणं, फुलं काढणं आणि तीं विकणं ! केरसुण्या तयार करणं...सारं पूर्वीप्रमाणंच ताईचं चालूं होतं ! " आपला मुलगा प्रोफेसर आहे. त्याला पुरेसा पैसा मिळतो...आपल्या ह्या गोष्टींनीं

त्याच्या प्रतिष्ठेला बाध येतो "...ह्या गोष्टी ताईच्या ध्यानींमनींसुद्धां नव्हत्या. प्रतिष्ठेचा फसवा बाऊ करण्याचं ताईच्या रक्तांतच नव्हतं !

पण त्यामुळं भगवंतरावांची स्थिति मात्र फार चमत्कारिक होऊं लागली. लोक आडून आडून निरनिराळं भलतं सलतं कांहीं तरी बोलूं लागले. भगवंतरावांना वाटूं लागलं, ' खरंच ताई असं वागते ! लोक काय वाटेल तें बोलतात...आपल्याला जगांत कांहीं किंमत आहे कीं नाहीं ! " भगवंतरावांनीं खूप विचार केला आणि ताईला म्हटलं, " ताई, तूं आतां हीं कामं बंद कर."

" कां रे ! तुला तर नाहीं ना त्रास होत ? "

" तसं नव्हे...पण लोक म्हणतात कीं प्रोफेसरची आई आणि इतरांचीं कामं करते...पैसे मिळवते—"

" बरं, मग ! —"

आतां मात्र भगवंतरावांना कळेना, कीं ताईला कोणच्या शब्दांत आणि कसं सांगावं ! कांहींशा रागांतच त्यांनीं म्हटलं, " समाजांत मला मानानं जगायचंय्, प्रतिष्ठेनं वागायचंय्...तुझ्या ह्या हलक्या सलक्या गोष्टींनीं...तुला पैसेच हवे तर तुझ्यासाठीं मी दोन शिकवण्या जास्त करीन. पण..."

" शहाणा आलास मला सांगायला! जीभ काढून मारे गप्पा मारतोय्...तूं रे काय मला पैशाच्या गोष्टी सांगणार ? जेवढे मिळवतोस तेवढे तूं खर्च करतोस ! "

भगवंतरावांनीं ताईची निरनिराळ्या तऱ्हेनं समजूत घालायचा प्रयत्न केला. पण कांहीं ऐकून घ्यायचीच मुळीं ताईची तयारी नव्हती.

भगवंतरावांपुढं प्रश्न उभा राहिला कीं आतां वागावं कसं ! ताईला सांगून पटत नाहीं. पुन्हां गप्प बसून सारं सहन करावं म्हटलं तर तेंहि

शक्य नाहीं. लोक काय बोलतात! प्रतिष्ठा म्हणून कांहीं गोष्ट जगांत आहे कीं नाहीं!

आतां प्रश्न एवढाच होता कीं प्रतिष्ठेचा बाऊ करावा कीं करूं नये! ताई ज्या विशिष्ट वातावरणांतून वर आल्या होत्या, त्या वातावरणाकडे पाहिलं कीं प्रतिष्ठेचा ताई बाऊ करीत नव्हत्या ह्यांत कांहींच वावगं नव्हतं! भगवंतराव ज्या मानाच्या जागेवर होते, ज्या समाजांत वावरत होते त्या दृष्टीनं विचार केला, कीं प्रतिष्ठेला जपणं भगवंतरावांचं कर्तव्य होतं.

प्रतिष्ठेचा बाऊ किती करावा एवढाच प्रश्न! पण हें न उमजल्यामुळें... तीन माणसांचं कुटुंब असूनसुद्धां तें भांडाभांडी, कलह आणि द्वेष ह्यांनीं पोखरलं गेलं.

असंच चालू राहिलं असतं! पण थोड्याच दिवसांपूर्वी एक प्रसंग घडला आणि प्रश्नाचं उत्तर आपोआप मिळालं.

भगवंतराव कॉलेजांतून परत आले होते. ताई स्वयंपाकघरांत काम करीत होत्या आणि शांतावहिनी बिछान्यावर पडून विव्हळत होत्या.

भगवंतरावाचं डोकं सुन्न झालं. त्यांना कळेना कीं अचानक बायकोच्या पोटांत दुखायला काय झालं! काय करावं तें कांहीं केल्या सुचेना. घरां-तले सारे उपाय झाले. पण पोट दुखायचं थांबेना......उलट पोटांत जास्तच दुखूं लागलं...भगवंतरावांनीं लगेच डॉक्टरला बोलावलं...... डॉक्टरनें गंभीरपणें पोट तपासलं आणि सांगितलं, "अपेंडिसायटिस आहे हा... इतके दिवस कसा त्रास दिला नाहीं कुणास ठाऊक! शक्य असेल तर लवकरच ऑपरेशन..."

भगवंतरावांच्या डोळ्यासमोर अंधारी आली! अपेन्डिसायटिस्... ऑपरेशन...पैसा! पैशाशिवाय अवघड ऑपरेशन पार पाडणं शक्य नव्हतं. भगवंतरावांनीं खूप विचार केला, पण त्यांना कळेना कीं आतां पैसा कुठून उभा करायचा! मधूनच त्यांना ताईचे शब्द आठवूं लागले,

" मिळवतोस तेवढा पगार तूं खर्च करतोस ! तूं रे काय मला पैसे देणार ? "

प्रतिष्ठेला जपणाऱ्या माणसाचा अहंकार दुखावला जात होता. कर्ज काढण्याची, पैशासाठीं दुसऱ्यापुढें हात पसरण्याची कल्पना भगवंतरावांना सहन होईना.. प्रसंग आला होता, पण प्रतिष्ठा आडवी येत होती.

हाताच्या तळव्यावर डोकं टेंकून भगवंतराव विचार करीत होते. विचारांचं काहूर थैमान घालीत होतं. जिकडे तिकडे विचार–विचारांचं काहूर आणि पैसा ! बिछान्यावर बायको तळमळत होती...दिवस पळत होता. बायको जास्तच ओरडत होती. पण पैसा उभा राहत नव्हता.

शेवटीं सारं पाहून ताईंनीं भगवंताला विचारलं, " काय ठरवलंस तूं !"

" कांहींसुद्धां विचारूं नको. जीव गेला तरी दुसऱ्यापुढं हात पसरणार नाहीं. आपल्या कुटुंबाच्या रक्तांतच नाहीं तें ! "

ताई किंचित् हसल्या, " ठीक आहे...पण मग काय करणार ! "

"कांहीं नाहीं–बायको मेली तरी चालेल. पण भीक मागणार नाहीं." वैतागाच्या भरांत भगवंतराव चटकन् बोलून गेले. ताई कांहीं काळ स्तब्ध राहिल्या. त्यांनीं भगवंताकडे रोखून पाहिलं आणि म्हटलं, " तुला कदाचित् बायको नको असेल, पण मला सून हवी आहे...हे घे पैसे—"

" पैसे !...तुझ्याजवळ... ताई ?– " भगवंतराव एकदम चपापले,

" तूं घे म्हणजे झालं...तुला काय करायचंय्–! आपल्या दारच्या सोनचांफ्यानं गेल्या पांच वर्षांत दिले हे मला, समजलास ? "

" आई !–" भगवंतरावांनीं दाटलेल्या कंठानं एकदम हांक मारली.

मायलेकांच्या डोळ्यांतून अश्रू पाझरत होते. प्रतिष्ठेची फसवी जळमटं धुऊन निघत होतीं...दोघांच्यामध्यें निर्माण झालेली दरी बुजत होती आणि फसवीं बंधनं तटातट तुटून मायलेक जवळ येत होतीं.

## ८ : मधलं दार

" सगुणा, ए सगुणा— "

आबांची हांक ऐकून सगुणावहिनींनीं हातांतलं काम तसंच बाजूला ठेवलं. पदर नीट सांवरला. केसावरून हात फिरवल्यासारखं केलं आणि माजघराच्या दिशेनें पावलं टाकायला सुरुवात केली.

वहिनींनीं विचार केला तरी त्यांना कळेना कीं सकाळच्या प्रहरीं नांवानें हांक मारणें कां झालें ! बाहेर कांहीं बिनसलें असलें म्हणजे ते हांक मारतात हें वहिनींना ठाऊक होतें. गेल्या आठवड्यांत भाऊजींविषयीं कांहीं गोष्टी कळल्यामुळें ते दिवसभर त्रागा करीत हें खरें असलें तरी घरांत हांक मारून ते कांहीं उणेदुरें बोलले, असें केव्हांच झालें नव्हतें. आणि म्हणूनच वहिनींना राहून राहून अचंबा वाटत होता कीं आज ओटीवरून हांक मारणें कां झालें ! सकाळच्या प्रहरीं, पूजेच्या तबकांत कांहीं नसलें वा देवघरांतल्या वस्तू जागच्या जागेवर नसल्या तरच ते चिडत असत. पण तसंहि आज कांहीं झालें नव्हतें. पूजा आटपून, देवघरांतून बाहेर पडलेल्या आबांना त्यांनीं मघाशींच पाहिलें होतें. मग असें असतांना एवढ्या सकाळीं झालें तरी काय !

माजघराच्या दरवाजांत उभं राहून वहिनींनी ओटीवर नजर फिरवली.

पडवींत ह्या टोकापासून त्या टोकापर्यंत आबा अस्वस्थपणें येरझारा घालीत होते हातांत पत्रासारखें कांहींतरी होतें. मधूनमधून हातांतल्या पत्रावर नजर फिरवण्याकरतां ते क्षणभर थबकत. पत्रांतला थोडाफार मजकूर वांचून दांत ओंठ खात; आणि पुन्हां येरझारे घालूं लागत. असें थोडा वेळ झाल्यावर पुन्हां एकदां मजकूर वाचण्याकरतां ओटीच्या खांबाशीं ते

थांबले; पत्रावरून त्यांनी घाईघाईनें नजर फिरवली. पुन्हां दांत ओंठ खाल्ले. पत्राची घडी करून खिशांत ठेवली. कांहींतरी विचार करीत डोई-वरून हात फिरवला आणि केलेला विचार पक्का करण्याकरतांच कीं काय सुटलेल्या शेंडीची भलीमोठी गांठ मारली. शेंडीची गांठ गुळगुळीत डोई-वर आणून ठेवतांना पुन्हां एकदां बायकोला हांक मारली, "सगुणा..."

माजघराच्या दरवाजांतून वहिनी चटकन् खांबाशीं आल्या. "हें काय ! कुणी ऐकलं तर ! लोक काय म्हणतील ! सकाळच्या प्रहरीं देवाचं नांव घ्यायचं सोडून..."

"आबा बायकोला नांवानं हांक मारतो असंच म्हणतील ना लोक ! म्हणू देत, काय म्हणायचं असेल ते म्हणू दे लोकांना. बाकी आतां काय म्हणायचं शिल्लक ठेवलय् लोकांनीं. त्या गाढवानं हे असे दिवे लावले. सारं गांव थुंकतय् माझ्या तोंडावर— "

वहिनींच्या मनांत आलं कीं गेला आठवडाभर ह्यांच्या मनांत चाल-लेली खळबळ आज कांहीं आकस्मिक कारणानें बाहेर पडत आहे. सकाळच्या वेळीं गांवकुटाळांपैकीं कुणीतरी येऊन भाऊजींविषयीं कांहीं-तरी खोटंनाटं सांगून गेला असेल आणि त्याचा परिणाम म्हणून हे असे कावले आहेत. त्यांचा राग शांत करण्याकरतां म्हणून वहिनींनीं म्हटलं, "झालं गेलं होऊन गेलं; तुम्ही कां उगाच त्रास करून घेतां ?"

"छान ! छान विचारतेस मला. म्हणे तुम्ही कां उगाच त्रास करून घेतां ! शेण खाल्लं त्या गाढवानं, पण तें सारं पचवावं लागतंय् मला. काळ्यांच्या बेचाळीस पिढ्यांत कुणी असं केलं नव्हतं, समजलीस !"

आबांना एवढे चिडलेले वहिनींनीं पूर्वी केव्हांच पाहिलें नव्हतें. किंचित् खालच्या आवाजांत, आबांचें मन वळवण्याकरतां वहिनींनीं पुन्हां म्हटलें, "पण मी म्हणतें, झालं गेलं होऊन गेलं. विसरून जावं आपण, भाऊजी लहान, आपण मोठे. क्षमा करावी त्यांना —"

" मूर्ख आहेस तूं. अप्पांच्या ह्या घरांत, ह्या देव्हाऱ्यांतल्या देवासमोर तुझा दीर कलावंतिणीच्या पोरीला घेऊन नाचणार, आणि तरीहि त्याचा कैवार घ्यावसा वाटतो तुला ! "

" नका हो असं बोलूं. भाऊजी लहान आहेत. तुम्हींच असं बोलूं लागलेत तर गांवांतलीं माणसं कुत्र्यासारखीं फाडून खातील त्यांना— "

" त्याच लायकीचा आहे तो गाढव ! मी काय त्याला लग्न करूं नको म्हणत होतों ! काळ्यांच्या घराण्याची प्रतिष्ठा, अप्पांची अब्रू, सारं कांहीं धुळीला मिळवलं त्या पोरट्यानं. कलावंतिणीच्या पोरीशीं लग्न केलं आहे म्हणे ! " रागाच्या भरांत आबा पुन्हां येरझारा घालूं लागले. ओटीवरच्या खांबाला ओठंगून वहिनी उभ्या राहिल्या. वहिनींना कळेना कीं ह्यास्या गोष्टींचें पर्यवसान आतां होणार तरी कशांत ! घराण्याच्या प्रतिष्ठेला किंवा मामंजींच्या—अप्पांच्या अब्रूला धक्का बसेल असें कुणी वागलें म्हणजे आबा संतापानें फुलून निघतात, एवढेंच नव्हे तर रागाच्या भरांत कांहीं वेडेवांकडें करावयासहि मार्गेपुढें पहात नाहींत, हें वहिनींना अनुभवानें ठाऊक झालें होतें. अशा वेळीं कांहीं बोलले म्हणजे शब्दानें शब्द वाढत जातो म्हणून थोडा वेळ स्तब्ध राहून, कांहीं वेळानें वहिनींनीं म्हटलें, " वाईट चालीच्या बाईची ती मुलगी हें मलाहि पटतं. पण मुलीचा तर कांहीं....." वहिनींना जें कांहीं बोलावयाचें होतें तें पुरें व्हायच्या आंतच आबा खेकसले, " गप्प बैस. एक शब्द सुद्धां बोलूं नको. अप्पांच्या पाठीमागें पोटच्या पोरासारखा वाढवला त्याला ते काय असे गुण उधळायला ! वकील होतो म्हणाला. म्हटलं कांहीं हरकत नाहीं. मी हा असा ठोंब्या. तूं तरी वकील हो. वकीलांची परीक्षा उतरली..."

" जाऊं दे तें. तुम्ही उगीच विचार करूं नका. "

" जाऊं दे कसं ! अग हें आंतडं आहे ना ! रक्ताचं पाणी करून अप्पांनीं धनसंचय केला. शेतीवाडी, दागदागिने, मानमरातब, कुबेराला

हेवा वाटेल अशी संपत्ति अप्पांनीं मिळवली. मी त्याचं जतन केलं. थोडी-फार भर टाकली असेल मी ! कुणासाठीं केलं हें सारं !...मला ना पोर ना बाळ..."

आबांच्या आवाजांतली विषादाची झांक वहिनींच्या चटकन् लक्षांत आली. नकळत त्यांच्या डोळ्यांत पाणी उभें राहिलें. पदरानें आंसवें पुशीत वहिनींनीं म्हटलें, "तुम्ही उगाच वाईट वाटून घेऊं नका. आपल्या का हातच्या आहेत ह्या गोष्टी ? भाऊजीच आपल्याला मुलाच्या जागीं."

इतका वेळ येरझारे घालणारे आबा एकदम थांबले त्यांनीं सगुणेकडे पाहिल्यासारखें केलें आणि म्हटलें, " अजूनपर्यंत त्याला तसा वाढवला. वाटलं, चांगला कुलीन घराण्यातल्या मुलीशीं लग्न करून तो काळ्यांचा वंश पुढें चालू ठेवील. पण हा असा गाढव...नाहीं. सगुणा नाहीं. तें आतां शक्य नाहीं. तो मेला व मी त्याला मेलों." वहिनी एकदम दचकल्या. रागाच्या भरांत आबांनीं असें कांहीं विचुक बोलावं ह्याचं त्यांना वाईट वाटूं लागलं. घाईघाईनें त्या आबांपाशीं आल्या; " हें काय बरं भलतंच ! असं अशुभ बोलूं नये माणसानं सकाळच्या वेळीं, रागाच्या भरांत तुम्ही कांहीं तरी बोलून जाता आणि सारा दिवसभर तेच माझ्या मनांत घोळत राहतं. तुम्ही केलं तें चांगल्याकरतां केलंत. भाऊजींना उमगलं नाहीं. चूक झाली त्यांची. क्षमा करावी आतां त्यांना--"

" केली असती, तरीहि त्याला क्षमा केली असती पण हें पत्र पाहिलंस ?" बोलतां बोलतां आबांनीं खिशांतून पत्र काढून वहिनीसमोर धरलं. वहिनींनी तें पटकन् हातांत घेतलं आणि आश्चर्यानें विचारलं. " कुणाचं ? भाऊजींचं ? कधीं आलं...काय लिहलंय् त्यांनीं ? "

" वाच. तूंच वाच काय लिहलंय् तें गाढवानं. "

वहिनींनीं झट्‌दिशीं पत्राची घडी उलगडली आणि वाचावयास सुरवात केली.

ती. आबांना सा. न. वि. वि.

तुम्हाला वाटलं असेल कीं त्यागा केला म्हणजे भाऊ कोकणांत येणार नाहीं. तुमच्या मतें मी घराण्याचें नांव बुडवलें. तुमच्या तोंडाला काळोखी फांसली. ठीक आहे. तरीहि मी कोकणांत येत आहे. वकिलीची सनद काढून येत आहे. येतांना बरोबर माझ्या बायकोला, सुमतीला—आबा, तुमच्यामतें कलावंतिणीच्या पोरीला —घेऊन येत आहे. माझें तोंडहि पहावयाची तुमची इच्छा नाहीं. जशी आपली मर्जी. अप्पानीं मिळवलेल्या इस्टेटीच्या वांटण्या करूं. सोनेनाणें वांटून घेऊं आणि आपण भाऊभाऊ आहोंत हें विसरून जाऊं.

ती. सौ. सगुणावहिनींना—त्या देवतेला माझा नमस्कार.

तुमचा— भाऊ.

पत्र वाचून होतांच वहिनींच्या हातून तें आपोआप गळून पडलें. त्यांना राहून राहून वाटूं लागलें कीं हें सारें भाऊजींना लिहवलें तरी कसें!

वहिनींचं पत्र वाचून झालेलं पाहून, इतका वेळ येरझारे घालणारे आबा एकदम त्यांच्यापाशीं आले आणि विचारूं लागले, "वाचलंस? वाचलंस काय लिहिलंय् त्या गाढवानं! म्हणे वाटण्या करूं, सोनंनाणं वाटून घेऊं! अरे, मला पोर ना बाळ. मी हा असा वांझोटा! एवढीसुद्धां अक्कल नाहीं त्याला. मूर्ख लेकाचा. सगुणे, ऐकलंस? येऊं दे त्याला. होऊं देत वाटण्या. माझ्या हिश्शाची इस्टेट नायकिणीच्या घरांत जाण्यापेक्षां रस्त्यावरच्या चोरापोराला मिळाली तरी चालेल. येऊं देच त्याला. कागदपत्र काढून ठेव. मीहि नाहीं म्हणावं—" तावातावातें आबा पडवीतून बाहेरच्या अंगणांत निघून गेले.

वहिनी मात्र विचार करीत जागच्या जागीं उभ्या राहिल्या. संसारांत अशी वेळ कधींच आली नव्हती. संसारांत दुःखें आलीं पण आलीं तशींच

निघून गेलीं. घरांतल्या देवांनीं असा अंत केव्हांच पाहिला नव्हता. असा मनस्ताप वहिनींनीं कधींच सहन केला नव्हता. भांडणें झालीं, खटके उडाले पण तेवढ्यापुरतेच !

आबांनीं एखादी गोष्ट मनांत घेतली कीं त्यापासून त्यांना परावृत्त करणें हें मोठें कठीण काम होतें. कांहीं झालं तरी भाऊजींविषयीं आबांचं मन आतां साफ होणार नाहीं असं वहिनींना वाटूं लागलं. भाऊजींच्या पत्राप्रमाणें आज उद्यां ते इथें निश्चित येतील. येतांना जाऊबाईंना बरोबर घेऊन येतील. भाऊजी दृष्टीस पडल्यावर हे जास्तच भडकतील. शब्दानें शब्द वाढेल. भांडणें होतील. वांटण्या होतील. काळ्यांच्या एका घराचीं दोन घरें होतील...त्यापेक्षां सध्यां भाऊजी इकडे आलेच नाहींत तर किती बरें होईल ! भांडणें टळतील. काळ्यांचें घर अभंग राहील. मनाच्या जखमा काळाच्या ओघांत भरून निघतील. खेळीमेळीचें वातावरण निर्माण होईल. पण हें सारें कसें शक्य आहे ? पत्राप्रमाणें आज उद्यां भाऊजी इथें येतील आणि आल्यावर......

रस्त्यावर बंदरावरून गांवांत येणाऱ्या सारवट गाड्या वाजूं लागल्या तेव्हां वहिनी एकदम भानावर आल्या. इतका वेळ अंगणांत असलेले आबा दरवाजांतून आंत आले आणि वहिनींना म्हणाले, “बंदरांत बोट आलेली दिसते. तुमचे दिवटे दीर आजहि येतील कदाचित् ! तुम्ही आंत व्हा पाहूं—” वहिनी आंत जाण्याकरतां वळणार तोंच एक गाडी घराकडे धांवत येतांना दिसली आणि पाहतां पाहतां दरवाजासमोर येऊन उभी राहिली. वहिनींना वाटलें असेंच पळत पळत आंत जावें, तांदुळाचे चार दाणे हातीं घ्यावे आणि जाऊबाईंच्या अंगावरून ओवाळून टाकावे. गाडीपाशीं जावें, जाऊबाईंना डोळे भरून पाहून घ्यावें, भाऊजींना कांहीं सांगावें......

गाडीपाशीं जाण्याकरतां वहिनी हालणार तोंच आबा कडाडले, “खबरदार आहे हालशील तर ! इथेंच उभी रहा.”

" पण—"

" हालूं नको म्हटलं ना ! इथंच उभी रहा. येऊं दे त्याला आंत—"

वहिनींनीं रस्त्यावर गाडीकडे नजर टाकली. भाऊजी गाडींतून उतरत होते. वहिनींना राहवेना तेव्हां त्यांनीं धीर करून म्हटलें, " अशा प्रसंगीं आपण सुतक्यासारखीं उभीं राहिलों तर भाऊजींना काय वाटेल ! ह्या गोष्टी तुम्हां पुरुषांना कळत नाहींत. रागवूं नये. होऊं कां मी पुढें—"

"जा, अगदीं पंचारती घेऊन जा. तूंसुद्धां शेवटीं त्याच्याच बाजूची—" आबांचें बोलणें ऐकलें न ऐकल्यासारखें करून वहिनी गाडीपाशीं आल्या. वहिनींना पाहिल्याबरोबर भाऊनें हांक मारली, " वहिनी—"

" भाऊजी—"

" वहिनी, आबा कुठं आहे ? किती रागावलाय तो माझ्यावर ! बोलत कां नाहींस वहिनी......"

" भाऊजी—"

" वहिनी, ही सुमति; सुमति, नमस्कार कर वहिनींना—"

" भलतंच कांहीं तरी ! असा कुणी रस्त्यावर करतं वाटतं नमस्कार ! आंत चला भाऊजी. ते तुमची वाट पहात असतील—"

" पण किती रागावलाय तो माझ्यावर ! कांहीं तरीच पत्र लिहिलं. आबा बोलेल तरी ना माझ्याजवळ— ?"

" ते पुढें आले नाहींत तरी मनांतून वाट पहात असतील. ते कांहीं बोलले तरी रागवूं नका भाऊजी—" भाऊजींना आणि जाऊबाईंना पाठीशीं घालून दबकत दबकत वहिनी आंत आल्या.

ओटीवर भिंतीकडे तोंड करून पाठमोऱ्या असलेल्या आबांना पाहून भाऊनें हांक मारली, " आबा—"

भाऊची हांक ऐकून आबांनीं दरवाजाकडे प्रश्नार्थक दृष्टीनें पाहिलें.

" आबा, मी आलों आहे. आंत येऊं ना ! घरांत येऊं ना, आबा—"

" घर अप्पांचं आहे. माझं नाहीं." आबांच्या तुटक उत्तरांतली धार भाऊला चांगलीच जाणवली. भाऊनें दचकून वहिनींकडे पाहिलें आणि सुमतीला म्हटलें, " चल सुमति, आंत चल. आबांना नमस्कार कर." सुमति चटकन् पुढें झाली. " नमस्कार करतें." सुमति नमस्कार करायला खालीं वांकली तरी आबांनीं तिच्याकडे पाहिलें नाहीं. वहिनींच्या हें चटकन् लक्षांत आलें. आबांनीं जाणूनबुजून केलेलें दुर्लक्ष भाऊजींच्या लक्षांत येऊं नये म्हणून वहिनींनीं म्हटलें, " हें काय! लक्ष नाहीं तुमचं. जाऊबाई नमस्कार करायला वाकल्या आहेत त्यांना आशीर्वाद द्या."

" माझ्या आशीर्वादाची गरज नाहीं त्यांना–रस्त्यावरच्या बायका त्या–साऱ्या गांवाचे आशीर्वाद मिळतील त्यांना "

"आबा–" इतका वेळ चाललेल्या प्रकाराकडे स्तब्धपणें पाहणारा भाऊ चिडून ओरडला. सुमति दचकून बाजूला झाली. वहिनी चपापल्या...

" ओरड–मोठ्यानं ओरड! तुला काय वाटलं! तूं ओरडलास तर मी भिईन होय! पुन्हां म्हणतो, ह्या रस्त्यावरच्या बायका......"

वहिनींना आतां राहवेना. प्रकरण चिडीस जाऊं नये म्हणून त्यांनीं म्हटलं, " हें काय भलतंच ! "

" भलतंच ! भलतंच नाहीं. खरं बोलतोय् मी. नायकिणीच्या मुली घरांत भरून काळ्यांच्या घराचा मला कुंटणखाना— " काय होत आहे हें कळायच्या आंतच भाऊ त्वेषानें आबांच्या अंगावर धावला, " तोंड आवर. तोंड आवर—खूप ऐकलं. भलतंसलतं ऐकून घेणार नाहीं मी आबा—" वहिनींनीं पुढें होऊन भाऊजींचा उगारलेला हात एकदम मागें खेंचला, " हें काय भलतंच ! किती झालं तरी तुमचे मोठे भाऊ आहेत ते. "

" मारूं दे—मारूं दे मला. तूं कशाला उगाच मधें पडतेस? चल हो बाजूला— " वहिनींची बकोटी धरून आबांनीं त्यांना बाजूला खेंचलें

आणि रागारागांत ते भाऊच्या पुढें जाऊन उभे राहिले, " मार-मार मला. असा नुसता पाहतोस काय ! तेवढंच शिल्लक राहिलं होतं अजून ! मार. मागं कशाला घेतलास तो हात—"

वहिनींना कळेना कीं दोघां भावांना आवरावें तरी कसें ! त्यांनीं धीर करून आबांचा हात धरला आणि म्हटलें, " तुम्ही आंत चला पाहूं ! "

" नाहीं. आतां आंत नाहीं. एक तो तरी इथं राहील, नाहींतर मी तरी. होऊं दे, त्याच्या मनाप्रमाणं होऊं दे. सगुणा, काढ, काढ त्या साऱ्या चोपड्या, दागदागिने, रोकड, कागदपत्र...मीसुद्धां कांहीं कमी नाहीं म्हणावं. "

ह्यावर कांहींतरी बोलण्याकरतां भाऊनें ' आबा ' म्हणून हांक मारली. तेव्हां उसळून आबा पुढें आले, " हांक मारूं नको मला. हांकसुद्धां मारूं नको. जें कांहीं तुझ्या वांटणीचं असेल ते घे आणि चालायला लाग. "

" हें काय बोलणं ! भाऊजी कुठं जातील ? "

" तूं उगीच मधें मधें बोलूं नको. त्याचं तो बघून घेईल. जें कांहीं असेल तें घेऊन त्याला तोंड काळं करूं दे. "

" मी कुठें जाऊं आबा— "

" जा—लागेल तिकडे जा. मसणांत जा. माझ्या दृष्टीसमोरसुद्धां उभा राहूं नकोस." बोलतां बोलतां आबा कागदपत्रांची पुडकीं भराभर जमिनीवर फेकूं लागले. " ह्या घरांत रहायची तुझी लायकी नाहीं. ह्या घरांत राहूं देणार नाहीं मी तुला—"

" आबा, घर जसं तुझं आहे तसंच माझंहि आहे. अप्पांनीं बांधलं आहे हें घर." भाऊच्या बोलण्यांतली हक्काची भाषा ऐकून आबा क्षणभर दचकल्यासारखे झाले. अशी भाषा पुढें आली तेव्हां ते गोंधळले. पण स्वतःला सांवरून त्यांनीं उलट आवाज चढवला आणि म्हटलं, " अप्पांनीं बांधलं आहे घर म्हणून मारे जीभ काढून बोलतोयस ! लाजा नाहीं कारे

वाटत ! नाना–अप्पा– तुझे वाडवडील ह्या घरांत वावरले. काळ्यांचे देव आहेत ह्या घरांत ! तुझी लायकी तरी आहे का ह्या घरांत रहायची ! म्हणे अप्पांनीं बांधलं आहे घर—"

"बस्स्—बस्स् कर आबा. मला जास्त बोलायचं नाहीं. ह्या घरावर माझाहि हक्क आहे. दोन भाग करूं घराचे. एका भागांत तूं रहा. एका भागांत मी राहीन. मधें भिंत घालूं. म्हणजे माझं तोंड तुला पहायला नको आणि तुझं तोंड मला पहायला नको."

"ठीक आहे. होऊं देत दोन भाग घराचे. पण मधें चांगली जाड दगडाची भिंत घालूं. तुझा संपर्क मला नको, माझा संपर्क तुला नको."

वहिनींना कळेना कीं हें सारें चाललें आहे तरी काय ! हे दोघे भाऊ प्राणापलीकडे प्रिय असलेल्या घराचे दोन भाग करायला निघाले, मधें भिंत घालायच्या गोष्टी सुरू झाल्या. आतां ह्याचें पर्यवसान होणार तरी कशांत ! कांहीं झालें तरी ह्यांतून कांहींतरी मार्ग काढावयास हवा म्हणून वहिनींनीं म्हटलें, "भिंत घालायची ! एका घराचे दोन भाग करायचे पण माझं वेडीचं ऐका—"

"बस्स्—बस्स् झालं आजपर्यंत ऐकलं तें—"

"बोलूं दे–बोलूं दे तिला. बोल वहिनी, काय सांगायचं आहे तुला–"

"भाऊजी, माझं वेडीचं ऐका. घराला भिंत घाला. वेगळे व्हा. काय लागेल तें करा. पण मधल्या भिंतींत मधलं दार तरी ठेवा—"

आबांना वाटलं कीं वेगळं व्हायचं, भिंत घालायची आणि मग भिंतींत दार कशाला ! तसं त्यांनीं बोलून दाखवलं तेव्हां डोळ्यांत पाणी आणून वहिनी म्हणाल्या, "माझं एवढं तरी ऐका. दार बंद राहूं दे. पण दार असूं दे—"

"करा. लागेल तें करा. ठेवा तुमच्या मनासाठीं दार, पण याद राखा. दरवाजा बंद राहिला पाहिजे, आजच्या आज बोलावतो गवं-

डयाला. होऊं दे सुरुवात भिंत घालायला. वांटणीहि होऊन जाऊं दे. कागदपत्र, दागदागिने, रोकड सारं कांहीं तयार ठेवतों मी—" रागारागांत कागदपत्र आणण्याकरतां आबा आंत निघून गेले.

इतका वेळ अवघडून उभ्या असलेल्या जाऊबाईच्या पाठीवर हात फिरवून वहिनींनीं म्हटलें, " चला बाई, आंत चला. आल्यापासून हें सारं असं चाललं आहे. तुम्ही ह्या घरांत नवीन. तुम्हांला काय वाटेल ! तुम्ही मात्र कांहीं जिवाला लावून घेऊं नका. चला भाऊजी, तुम्हीहि आंत चला. असे परक्यासारखे बाहेर उभे राहून काय करणार ! " दीर–जाऊबाईला घेऊन वहिनी आंत गेल्या.

त्याच दिवशीं आबांनीं सर्व कागदपत्र एके ठिकाणीं जमा केले. दागदागिने, रोकड सारें कांहीं तयार केलें आणि सगुणेला हांक मारून म्हटलें, " बोलाव—बोलाव त्याला. तडकाफडकीं वांटण्या करून टाकूं दे. सारं कांहीं तयार आहे. मीहि कांहीं कमी नाहीं म्हणावं—"

दोघे भाऊ वांटण्या करायला एका बैठकीवर बसले. सगुणावहिनी आणि सुमति माजघराच्या दाराशीं आंतल्या बाजूला दबकून उभ्या राहिल्या. आबांनीं न बोलतां भाऊपुढें कांहीं कागद टाकावेत; भाऊनें ते वाचावे आणि बाजूला ठेवावे असें बराच वेळ चाललें होतें. शेवटीं भाऊनें सर्वेच म्हटलें, " शेतीवाडी, घरदारं हीं राहूं देत बाजूला. मला ठाऊक आहे कीं स्थावर इस्टेट मी लोकांना वाटीत सुटलों तरी खपणार नाहीं. आपण सोन्यानाण्याविषयीं बोलूं—प्रथम देवांपासूनच सुरुवात करूं—"

" देव ! " आबा एकदम आश्चर्यानें भाऊकडे पाहूं लागले.

" होय–देव. देवघरांतले देव सोन्याचे आहेत आबा " बोलतां बोलतां भाऊचे डोळे बारीक होऊन लकाकूं लागले. भाऊच्या बोलण्यांतला आशय उमगून आबा एकदम दचकले. आबासारखा एरव्हीं ताठ वागणारा माणूस देवांची गोष्ट पुढें आली तेव्हां विरघळला. एकदम गहिव-

रून आबांनीं म्हटलं, " नको भाऊ, तेवढंच बोलूं नको. काय लागेल तें माग. गांवांतलीं सारीं शेतं तुला देतों. जमिनजुमला तुझ्या नांवानं करून देतो. सारं कांहीं तुला देतो. आणि भाऊ, अरे मी मेल्यावर सारं तुझंच आहे. " आबांच्या डोळ्यांतलें पाणी पाहून भाऊची वृत्ति एक क्षणभर बावरल्यासारखी झाली. पण विचार करून भाऊनें निश्चयपूर्वक म्हटलें, " नको. तुझे काडीचे सुद्धां उपकार नकोत मला! जें माझ्या हक्काचं आहे तें मला मिळालंच पाहिजे. देवघरांतल्या देवांची, ते सोन्याचे आहेत म्हणून वांटणी झालीच पाहिजे. "

" भाऊजी—"

भाऊनें एकदम दरवाजाकडे पाहिलें. दरवाजांत उभा असलेल्या वहिनींना पाहून त्यानें म्हटलें, " नाहीं वहिनी, हा व्यवहाराचा प्रश्न आहे. देव्हाऱ्यांतले देव सोन्याचे आहेत. आजमितीला देव विकायला काढले—"

" भाऊ, नको रे असं बोलूं. माझे देव माझ्यापाशीं ठेव. काळ्यांच्या देवांनीं अजूनपर्यंत काळ्यांना कधींच दगा दिला नाहीं. मला एवढी भीक घाल. भाऊ, माझं एवढं ऐक, देवावर नको रे उठूं—"

इतका वेळ दाराआड उभी असलेली सुमति एकदम पुढें झाली, " ते एवढं म्हणताहेत तर तुम्ही तरी कां हट्ट धरता ! देवावर त्यांची श्रद्धा आहे. राहीनात देव त्यांच्याजवळ...... "

" शहाणी आहेस तूं ! बोलूं नकोस......"

" नाहीं नाहीं—माझं एवढं ऐका. एवढं तुम्हाला ऐकलंच पाहिजे. "

" होऊं दे—होऊं दे एकदां तुझ्या मनासारखं. पण आतां घराला भिंत पडूं दे. "

त्यानंतर त्याच बैठकीला देण्याघेण्याचा व्यवहार उरकण्यांत आला. शेतेंभातें, जमीनजुमला, दागदागिने, सोनेंनाणें साऱ्या गोष्टींची वांटणी करण्यांत आली.

लहानपणापासून एकत्र वाढलेले भाऊ एकाच घरांत पण बाजूबाजूला राहूं लागले. दोन भागांमध्यें चांगली जाड, दगडाची भिंत उभी राहिली.

मधून मधून आबांना ह्या साऱ्याचें वाईट वाटे. आपलें कांहीं चुकलें तर नाहींना अशी त्यांना शंका येई. पण भाऊची वृत्ति आणि एकंदर वर्तणूक आठवली म्हणजे त्यांना चीड येई. राहून राहून त्यांना वाटे कीं आपण भाऊला लग्न करूं नको असें कुठें म्हटलें होतें. चांगली कुला-शीलाची मुलगी पाहून त्याने लग्न केलें असतें तर काळ्यांच्या घरांतला नंदादीप सदैव तेवत राहिला असता. नायकिणीच्या मुलीशीं लग्न करून वंशवेल थोडीच पुढें वाढणार आहे!

दोघेहि भाऊ पिळानें वागत होते. वर्षभरांत भावाभावांनीं एकमेकांचीं तोंडें सुद्धां पाहिलीं नव्हतीं. एकमेक एकमेकांकडे जात येत नसत, एवढेंच नव्हे तर बायकांनाहि बंदी होती. " पलीकडे गेलीस तर तंगडी मोडून ठेवीन " म्हणून आबांनी सगुणावहिनींना दम भरला होता.

सुमति ह्या घरांत नवीन होती. तिला नात्यांतल्या माणसांविषयीं ओढ असणें शक्य नव्हतें. वहिनींना मात्र वारंवार वाटे कीं भाऊजींकडे जावं, झालं गेलं विसरून चार सुखदुःखाच्या गोष्टी बोलाव्या. निदान एकमेकां-कडे पाहून नुसतें हंसावें तरी. पण असें कितीहि वाटलें तरी जोपर्यंत आबांबरोबर दिवस काढावयाचे होते तोपर्यंत त्यांचें मन दुखवून पलीकडे जाणें कसें शक्य होतें! दीर आवडता असला, लहानपणापासून मुला-सारखा वाढवल्यामुळें अंतःकरणांत प्रेम असलें, कितीहि ओढ असली तरी नवऱ्याला दुखवून कसें चालेल!

मधून मधून वहिनी मोलकरणीमार्फत बातमी काढीत...

सुमतीला दिवस गेले आहेत हें ऐकल्यापासून मात्र वहिनींना आनंद वाटूं लागला. आशेचा किरण दिसूं लागला. अकुलीन घराण्यांतल्या मुलीशीं लग्न केल्यामुळें भाऊला मूल होणार नाहीं; काळ्यांचा वंश निर्वंश

होईल; काळ्यांच्या घरांतला नंदादीप अखंड तेवणार नाहीं असें जें आबांना वाटत आहे तें खोटें ठरेल. आणि खरोखरच तें खोटें ठरलें तर किती चांगलें होईल ! कदाचित्...

वहिनींना वाटे कीं ही गोष्ट आबांना सांगून टाकावी. पण सांगावयाचा मात्र धीर होत नसे. शेवटीं शेवटीं जेव्हां दिवस भरत आले तेव्हां भीत-भीत वहिनींनीं ही गोष्ट आबांच्या कानांवर घातली. पण एवढी आनंदाची गोष्ट ऐकूनहि आबा कांहीं बोलले नाहींत. चेहऱ्यावर हर्षाची रेषाहि उमटली नाहीं...

अखेर एक दिवस मोठ्या निर्धारानें वहिनींनीं म्हटलें, "तुमचं लक्षच नाहीं मी काय म्हणते तिकडे !"

"ठाऊक आहे मला तूं काय विचारणार तें—"

"आणि तरीहि अजून तुम्हांला—"

"नाहीं. नाहीं पटत मला. आपणहून त्याच्या दाराशीं मी तुला जाऊं देणार नाहीं."

"आपणहून दुसऱ्याच्या दाराशीं न जायला भाऊजी लोक कां आहेत !" वहिनींचा हा प्रश्न ऐकून आबांनीं त्यांच्याकडे रोंखून पाहिलं आणि तडकाफडकीं सांगितलं, "कुणा दुसऱ्याचं घर असतं तर जरूर पाठवली असती तुला. पण माझ्या वैऱ्याच्या दाराशीं माझ्या बायकोनं—"

"तुम्हांला कळणार नाहींत ह्या गोष्टी—"

"बस्स्. बस्स् कर. कळतात. चांगल्या कळतात मला ह्या गोष्टी. कांहीं मरत नाहीं ती—"

"हें काय भलतंच; आमचीं दुःखं आम्हांला ठाऊक ! तुम्हां पुरुषांना काय कळणार ?" एवढें बोलून रागारागांत वहिनी तेथून निघून गेल्या.

त्या दिवशीं हें बोलणें तेवढ्यावरच थांबलें तरी चार दिवसांनीं पुन्हां वहिनींनीं म्हटलें, " इतके दिवस तुमचं ऐकलं. नऊ महिन्यांत एकदां-सुद्धां जाऊबाईंना भेटलें नाहीं. आज सकाळपासून त्यांचं पोट दुखूं लागलं आहे. जाऊबाईंची पहिलीच खेप आहे ही. तुम्ही नाहीं म्हटलंत तरी मी जाणार—" सगुणेचा निर्धार पाहून आबा काय समजायचें तें समजले. त्यांना वाटलें कीं आतां कांहीं सांगितलें तरी ही ऐकणार नाहीं. तेव्हां त्यांनीं रागांत म्हटलें, " जा—जा—नाहींतरी माझं ऐकतां आहां कुठें तुम्ही आतांशीं ! करा—लागेल तें करा." आबांचें बोलणें पुरें व्हायच्या आंतच मागल्या दारून तुळशीवृंदावनाला डावी घालून वहिनी पलीकडे गेल्या. आबा मात्र कांहीं वेळ जागच्या जागीं उभे राहिले. जरा वेळानें त्यांना काय वाटलें कुणास ठाऊक ! ते नकळत मधल्या भिंती-जवळ येऊन उभे राहिले.

वहिनीला अशी अचानक आलेली पाहून भाऊला आश्चर्य वाटलें. त्यानें घाईघाईनें विचारलें, "वहिनी तूं आलीस? पण आबांनीं पाहिलं नाहीं ना? वहिनी, आबाला विचारून आलीस कां तूं—"

" होय भाऊजी, त्यांनींच पाठवलं मला—"

" किती बरं झालं ! तूं नुसती इकडे आलीस तरी केवढा धीर आला मला ! तिची भिती वाटते ग मला. डॉक्टर म्हणतात—"

" घाबरूं नका भाऊजी, मी पाहते सारं कांहीं—"

" पण वहिनी, जरा कठीण आहे ग वेळ—"

" थांबा हं भाऊजी, मी आलेंच. ते येतात का पाहते. " एवढें बोलून पुनः पळत पळत वहिनी आपल्या भागांत आल्या. सगुणेला परत आलेली पाहून आबा भिंतीजवळून चटकन् पुढें आले, " आलीस ! ये–किती वेळ वाट पाहतोय मी तुझी. कसं आहे तिचं ? " आबांच्या वृत्तींतला फरक जाणवून वहिनी गोंधळल्या. त्या नुसत्या त्यांच्याकडे पाहातच राहिल्या.

सगुणा बोलत नाहीं असें पाहून आबांनीं पुन्हां एकदां विचारलें, " एवढा मी विचारतोय् पण तूं कांहीं बोलत नाहींस ! कसं आहे तिचं ? " आणि मग त्यांचं त्यांनाच काय वाटलं कुणास ठाऊक ! कांहींशा त्राग्यानेंच ते बोलूं लागले, " ठीक आहे; ठीक आहे ! जाऊं दे, मीच गाढवासारखं वागतोय्–" आणि रागारागांत आबा ओटीवर निघून गेले. आपण कांहींच उत्तर दिलें नाहीं म्हणून आबा रागावले हें वहिनींनीं ओळखलें. त्या त्यांच्या पाठोपाठ ओटीवर आल्या. " असं काय बरं ! मी मुद्दाम का तुम्हांला सांगितलं नाहीं ! जरा कठीण दिसते हो वेळ– " ओटीवर गेलेले आबा कांहींतरी विचार करून माजघरांत आले. माजघरांत देवघरापाशीं गेले आणि सगुणेला म्हणाले, " असं कर सगुणे, काढ–आपले देवघरांतले देव बाहेर काढ आणि त्यांतला गणपति पाण्यांत टाक. काळ्यांच्या देवांनीं काळ्यांना, निदान मला तरी अजूनपर्यंत कधीं दगा दिला नाहीं. पहात काय राहिलीस ! अग आम्ही किती भांडलों तंडलों तरी शेवटीं रक्त आहे ना ! पाण्यांत टाक म्हणतो ना गणपति... " वहिनी चटकन् देव्हाऱ्यापाशीं गेल्या. त्यांनीं देव बाहेर काढला आणि पाण्यांत टाकला. देव पाण्यांत टाकतांना थोडा आवाज झाला तेव्हां आबा एकदम ओरडले, "अग हळूं केवढ्यांदा टाकतेस देव पाण्यांत. जा. परत जाऊन ये भाऊकडं. तिची नीट चौकशी कर– "

" मी म्हणते– "

" कांहींसुद्धां म्हणूं नको तूं. जा म्हणतो ना. राहूं दे देव पाण्यांत– " आबा हें सगुणेला सांगत आहेत तोंच सुमतीचें विव्हळणें स्पष्टपणें ऐकूं आलें. सुमतीचें विव्हळणें ऐकून आबांना काय वाटलें कुणास ठाऊक ! ते एकदम मधल्या भिंतीशीं गेले आणि सगुणेला हांक मारून सांगूं लागले, " नाहीं तर असं कर सगुणे, तें मधलं दार आहे ना, तें उघड. मीच जातों भाऊकडे. त्याचं चुकलं असलं तरी मी त्याचा मोठा भाऊ आहे.

जा-उघड तें दार-उघड म्हणतों ना! -" वहिनी कमालीच्या आश्चर्य-चकित झाल्या. घाईघाईनें दरवाजापाशीं जाऊन त्यांनीं कडी काढली. आबांनीं दरवाजाच्या फळ्या एकदम लोटल्या आणि इकडे तिकडे पाहून हांक मारली, " भाऊ—कसं आहे तिचं ? "

भाऊला कळेना कीं बोलावें तरी काय ! " आबा, तूं आलास ? मधलं दार उघडून आलास ! "

" वेड्या, अरे अशा वेळीं डोळ्यांत अश्रु कशाला ? "

एवढ्यांत एकदम खोलींतून नवागताच्या रडण्याचा आवाज ऐकूं आला. भाऊनें लाजून आबाकडे पाहिलें. आबाला मिस्किलपणें हंसतांना पाहून भाऊ जास्तच लाजला. कांहींतरी बोलावयास हवें म्हणून भाऊनें म्हटलें, " पण आबा तूं उभा का ! किती दिवसांनीं भेटतोय् आपण ! "

" होय भाऊ, खरंच किती दिवसांनीं मी तुला पाहतों आहे ! मला तुझ्या-कडे डोळे भरून पाहूं दे."

इतका वेळ खोलींत असलेल्या वहिनी खोलीच्या बाहेर पडतांपडतांच भाऊजींना म्हणाल्या, " भाऊजी, पेढे काढा. मुलगा झाला."

सगुणेच्या तोंडचे शब्द ऐकून आबांना एकदम गहिंवरुन आलें; " भाऊ, आपला वंश पुढें चालू राहिला. झालं गेलं आपण विसरून जाऊं. आज मधलं दार उघडलं गेलं. आतां उघडंच राहूं दे तें मुला-साठीं. अरे आपण मोठीं माणसं ! क्षुल्लक कारणावरून भांडतों पण म्हणून जन्मभर कां एकमेकाचं तोंड पहायचं नाहीं ? आपल्या अंतः-करणाचीं मधलीं दारं, हृदयाचीं कवाडं आतां एकमेकांसाठीं उघडीं ठेवूं रे भाऊ ! पण हें काय ? अशा आनंदाच्या वेळीं—"

"नाहीं आबा—हें आनंदाश्रु आहेत. किती आनंद झाला आहे मला!"

